भारत-इतिहास-संशोधक मंडळ पुणें, पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ४१.

# वैद्य दप्तरांतून निवडलेले कागद

## खंड १

### १६४१-१७४०.




संपादक-
शंकर लक्ष्मण वैद्य,
२७६ बुधवार पेठ, राममंदीर पुणें.

शके १८६६ 1866



किंमत आडीच रुपये. Rs 2/8

[भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या सभासदांस किंमत दोन रुपये.]

# अनुक्रमणिका.







# पुरस्कार

( श्री. चिं. ग. कर्वे, चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणें. )

भा. इ. सं. मंडळाच्या पुरस्कृत ग्रंथमालेंत चालू सालांत एकदम दोन पुष्पांची भर पडत आहे. गुण्ये घराण्याचा इतिहास व हा वैद्यदफ्तराचा पहिला खंड एकदमच बाहेर पडत आहेत व बरेच अस्सल कागद संशोधकांना प्रथमच उपलब्ध होत आहेत. या वैद्यदफ्तराचा स्थूल परिचय भा. इ. सं. मंडळाच्या मागील त्रैमासिकाच्या अंकांत दिलेला असून, या खंडाच्या प्रारंभीं रियासतकार रा. ब. सरदेसाई यांनींहि पुन्हां तो करून दिला आहे. चंद्रचूड दप्तर, पुरंदरे दप्तर यांप्रमाणेंच वैद्यदप्तरहि मोठें व महत्वाचें असून श्री. शंकरराव वैद्य यांच्या दीर्घ परिश्रमानें तें आज प्रसिद्ध होत आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील लावगन वैद्य गांवचें हें लावगनकर वैद्य घराणें इतिहासप्रसिद्ध आहे. या शिवकालीन घराण्याची माहिती वंशावलीसह श्री. वैद्य यांनीं दिलेली आहे. तीवरून पाहातां या घराण्यांतील भास्करभट, बाळंभट, विश्वनाथभट व बाबूराव या सारख्या थोर मुत्सद्दी पुरुषांचा आज पर्यंतच्या इतिहासकारांस विसर पडलेला दिसतो. पारसनीससंग्रहांत या वैद्यांसंबंधीं बरेच कागद आहेत पण ते अप्रकाशितच आहेत. श्री. शंकरराव वैद्य यांनीं आपल्या पूर्वजांचें ऋण फेंडण्यासाठींच म्हणा इतिहाससंशोधनाचा जरूर व्यासंग उतारवयांत लावून घेतला व वाई येथील वैद्यदफ्तर भाऊबंदकी मधून शाबूत मिळविलें. या दप्तरांतील हजारों कागदांची जंत्री त्यांनीं मान मोडून आणि डोळे फोडून तयार केली. मधून मधून मंडळाच्या पाक्षिकसभा व संमेलनें यांतून कांहीं कागद त्यांनीं वाचले व कांहीं निरनिराळ्या घराण्यांच्या इतिहासासाठीं निवडून दिले. वयाच्या पाऊण शतकाचा पल्ला गांठलेला असतांहि पंचविशींतल्या तरुण कार्यकर्त्या प्रमाणें ते या संशोधनासाठीं पायपिटी करीत असतांना पाहिलें म्हणजे त्यांच्यासंबंधीं साहाजिक आदर वाटतो. सर्व वैद्यदप्तर त्यांच्याच हातून असेंच प्रकाशित व्हावें असें ईश्वरापाशीं मागणें मागावेसें वाटतें.

प्रस्तुत खंडांत ७१ पत्रें असून प्रत्येकाचा थोडक्यांत इंग्रजींत आशय दिला आहे. वैद्यदफ्तर बहुतेक सावकारी हिशेबाचें आहे; त्यांत राजकीय महत्वाचे मुद्दे थोडेच असणार. तथापि हिशेबांच्या कागदांचा अभ्यास कमी महत्त्वाचा नाहीं. मराठ्यांचा आर्थिक आणि सामाजिक व्यवहार नक्की समजून घेण्यास हेंच एक साधन आहे. श्री. ना. गो. चापेकर यांच्या 'पेशवाईच्या सावलीत' हिशेबी माहिती सादर केली आहे ती निःसंशय हिशेबी अभ्यासाला चालना देणारी आहे. पंडिती ( पी. एच्. डी. ) परीक्षेसाठीं विद्यार्थ्यांनीं या हिशेबाच्या कागदांचा चिकित्सात्मक अभ्यास केला पाहिजे. त्यांच्या प्राध्यापकांनीं त्यांच्यामध्यें या प्रकारची आवड उत्पन्न केली पाहिजे. तेव्हां या वैद्यदफ्तराचें महत्त्व या अर्थेतिहासाच्या दृष्टीनें फार आहे. असो. जास्त विवेचन 'पुरस्कारां'त योग्य नाहीं.

छपाईच्या कामांत अधिक सूक्ष्म, साक्षेपी व शास्त्रीय दृष्टि असावी अशी संशोधकांची अपेक्षा असणार. सध्याच्यापेक्षां अधिक अनुकूल स्थितींत ती पुरीहि झाली असती, एवढी आम्ही खात्री देतों. या वैद्य घराण्यांत संन्यासी आणि सती माणसें होऊन गेलीं आहेत. त्याच निस्वार्थी वृत्तीनें श्री. शंकरराव वैद्य आपलें दफ्तर उघडून दाखवीत आहेत. तेव्हां त्यांना पुरस्कार देणें आपलें कर्तव्य ठरतें.

# प्रस्तावना

वाईच्या वैद्य घराण्याच्या दफतरांतील ऐतिहासिक कागदांचा हा पहिला खंड प्रसिद्ध होत आहे. या दफतरासंबंधानें रा. ब. सरदेसाई यांनीं सुमारे हजार दीड हजार कागद पाहून त्या संबंधानें आपला इंग्रजींत अभिप्राय दिला आहे तो मराठी अनुवादासह प्रारंभीं छापिला आहे. त्या नंतर 'वैद्य दफतराबद्दल माहिती' हा विस्तृत लेख दिला आहे. शेवटीं ऐतिहासिक ७१ पत्रें छापण्यांत आलीं आहेत.

इतिहासाचार्य कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' म्हणून खंड छापिले आहेत. त्यांत आठव्या खंडाच्या प्रस्तावनेच्या ५ व्या प्यान्यांत त्यांनीं जुनें ऐतिहासिक लेख कसें छापावें याबद्दल साधारण ५ दंडक दिले आहेत. ते असे:—

(१) प्रथम लेख जसेंच्या तसें शुद्ध छापावे. (२) ते मिळाले कोठून, ते अस्सल आहेत किंवा नक्कल आहेत, ते आहेत कोणत्या स्थितींत वगैरे माहिती पूर्ण द्यावी. (३) त्यांतील कठीण व दुर्बोध एकोन एक शब्द व वाक्यें छानून तपासावी व त्यांचा अर्थ द्यावा. (४) त्या पासून अनुमानें काय निघतात तें मुद्देसूद लिहावें. (५) व शेवटीं त्या पासून संगतवार वृत्तांत काय निघतो तें दाखवावें.

वरील दंडक पाळून ऐतिहासिक कागद छापावे, हें जरी खरें आहे तरी वयोमानानें आलेल्या शारीरिक दौर्बल्यतेकडे व स्वतःच्या ऐतिहासिक ज्ञानाकडे लक्ष देऊन शक्य तितके दंडक पाळून मी कागद छापण्यास सुरवात केली आहे.

पहिला दंडक शक्य तोंवर पाळिला आहे. कागदांतील मोडी अक्षर कांहीं ठिकाणीं दुसऱ्यास विचारूनही लागलें नाहीं व कागद फाटल्यामुळें कांहीं शब्द किंवा ओळी छापतां आल्या नाहींत, त्या ठिकाणीं फुल्या दिल्या आहेत. पत्रांत पुष्कळ ठिकाणीं 'अखंडित लक्ष्मी अलंकृत' या पूर्वी एक अक्षर लपेटीनें काढलेलें असतें त्याचा अर्थ मला कळला नाहीं. तें अक्षर आज पर्यंत छापलेल्या प्रसिद्ध पत्रांत 'द' किं 'छ' असें छापिलें आहे. प्रतिनिधींच्या इतिहासांत त्याचा ब्लाक करून जसेच्या तसें तें छापिलें आहे. कांहीं पत्रांत त्या अक्षराच्या मागे दोन उभ्या रेघा आहेत. मी या अक्षराची जागा 'द किंवा छ' या अक्षरानें दाखविली आहे. पुष्कळ पत्रावर शिक्के व मुद्रा आहेत ते जशाच्या तसे छापण्याचा प्रयत्न केला आहे. कांहीं शिक्यांचा आकार छापतां आला नाहीं, म्हणून त्याचें वर्णन दिलें आहे. शिक्यांतील मजकूर जसा समजला तसा छापिला आहे. दुसऱ्या दंडकासंबंधानें 'वैद्य दफतराबद्दल माहिती' या लेखांत बराच खुलासा केला आहे. पत्रें जशीच्या तशीं नक्कल करून छापिलीं आहेत. यामुळें पत्रांत 'नकल' किंवा 'तालिक' हा शब्द असेल तर तो छापिला आहे. नकल हा शब्द पत्रावर नसेल तर तें अस्सल समजावें लागेल. तिसरा दंडक मी आपल्या बुद्धीनें पाळण्याचा प्रयत्न केला आहे. पण तो समाधानकारक झालेला नाहीं. कारण कांहीं शब्द किंवा वाक्यें मला अर्थाच्या दृष्टीनें कळलीं नाहींत म्हणून त्याबद्दल मला टाळाटाळीच करावी लागली. त्याचें वाचकांनींच संशोधन करावयास पाहिजे.

चौथा व पांचवा हे दंडक मला पाळतां आले नाहींत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. छापलेलीं पत्रें ' इतिहासाचीं साधनें ' म्हणून संशोधकांनीं उपयोगांत आणावयाचीं आहेत. माझीं अनुमानें व वृत्तान्त मधून मधून टीपेंत पाहण्यास सांपडतील; पण तो मजकूर दंडकास उतरणारा नाहीं. म्हणून वाचकांनीं इतर आधारांचाच उपयोग करणें जरूर आहे. हे दंडक पाळण्याकडे लक्ष दिलें असतें तर कागद छापण्याचें काम मागें टाकावें लागलें असतें. कारण तें फुरसतीचें व विद्वत्तेचें काम आहे.

या खंडांतील ७१ पत्रांची वर्गवारी खालीं दिल्याप्रमाणें आहे. खंडकर घराण्याचीं पत्रें १२, सनदा व आज्ञापत्रें १२, भास्करभटांस आलेलीं पत्रें ६, जगथापांच्या कर्जफेडीबद्दल पत्रें ९, सावकारी हिशोब ११, शिलकबंद ५, पालेकरांचीं पत्रें ४, लेखक न समजलेलीं पत्रें ६ सोमवंशी संबंधीं पत्रें ४ बाळंभट व विश्वनाथभटांस आलेलीं पत्रें २.

(१) खंडकर घराण्याचीं पत्रें:--हीं इसलामपूरचे रा. वासुदेवराव मुंडले यांचे संग्रहांतील आहेत. त्यांनीं दिलेल्या पत्रांपैकीं या खंडांत फक्त सन १७४० पूर्वींचींच छापिलीं आहेत. खंडकरांचें दुसरें नांव फगरे असें आहे. यांचा उल्लेख वैद्य दफतरांत १७४० नंतर आलेला आहे. खंडकर हे वसिष्ट गोत्री कऱ्हाडे ब्राह्मण असून या पत्रांत शिवकालापासून सनदापत्रें आहेत, म्हणून जरी पत्रें वैद्य दफतराबाहेरील आहेत तरी त्यांस महत्व दिलें आहे. या पत्रांत विशेष गोष्टी खालीं दिल्याप्रमाणें आहेत. १ पहिलें पत्र आदिलशाही फर्मान आहे. पुढील पत्रांत छत्रपतीच्या सनदा व आज्ञापत्रें आहेत. त्यावरून जुनी दरबारी भाषा कळते. २ दाभोली लारी या नाण्याचा पत्रांत उल्लेख असून एका पत्रांत त्याची किंमत ४ लारीचा एक रुपया अशी दिली आहे. ३ दाभोळ प्रांताच्या सुभेदारांचीं नांवें यांत आहेत. ४ वतनाच्या नोकरींत खंड पडला तर दंड घेऊन वतन सुरू केल्याचे दाखले आहेत. ५ शिवाजी महाराजांनीं कोंकण प्रांत हस्तगत केल्यावर जमीनीची मोजणी ( बटाई ) केली व वतनाची नक्त नेमणूक ठरविली, पण ती वतनदारांस पुरेशी नाहीं असें वाटल्यावरून त्यास वर्षासनें देण्यास सुरुवात केली. ६ राजारामाच्या कार्कीर्दींत रामचंद्रपंत अमात्य यास सनदापत्रें देण्याचा अधिकार होता. ७ शिर्के हे त्या प्रांताचे देशमूख होते. शाहूमहाराजाची स्त्री सकवारबाई ही शिरक्यांची मुलगी. ८ निळो सोनदेव अमात्य यांचा शिक्का ते वारल्यानंतरच्या पत्रावर आहे. आणखी ४।५ न पाहण्यास मिळणारे शिक्के यांत आहेत.

( २ ) सनदा व आज्ञापत्रें:-- पत्र नं. ९, १२ १६ १७ व १९ हृा शाहू महाराजांनीं त्र्यंबक सुंदर व भास्करभट यांस दिलेल्या इनाम जमिनीच्या व गावाच्या सनदा आहेत. पत्र नं. २५ वैद्यांना कचरे गावची खोती, दंड घेऊन देण्याबद्दल अंम्ब्यांचें आज्ञापत्र आहे. पत्र नं. २१ ही सचिवांनीं भास्करभटास जांबळी गांव इनाम दिल्याची सनद आहे पत्र नं. ३१ व ४२ हीं महादाजी गदाधर अमात्यानें वैद्यांच्या कर्जाच्या फेडीसाठीं लासुर्णे गावचा वसूल लाऊन दिल्याबद्दल आज्ञापत्रें असून त्याचा हिशोब पत्र नं. ६६ मध्यें दिला आहे. यांत रंगराव उद्धवाचा उल्लेख आहे. हा राजाज्ञा असावा. कर्ज फिटलें नाहीं म्हणून पुनः लासुर्णे गांवचा वसूल बाळंभट वैद्यांस देण्यासाठीं महाराजांनीं पत्र नं. ६७ चें आज्ञापत्र काढलें आहे. अमात्य, प्रतिनिधी, सुमंत व सचीव यांच्या नेमणुकींत फार भानगड शिवकालापासून आहे, महादाजी हा विशाळगडच्या प्रतिनिधीपैकीं

नाहीं. यांचा पंजा अनंतभट त्र्यंबकेश्वरीं राहत असे. ( पे. द. ४४ पान ४१ पहा. ) बाळकृष्ण वासुदेव हणमंते हा शहाजी जवळ शिवनेरीस १६२६ मध्यें अमात्य असल्याचा उल्लेख आहे ( पे. द. ७. १७, १८ पहा ) हें पद निळो सोनदेवास कधीं मिळालें कळत नाहीं. निळो सोनदेव यास १६४१ ते १६४५ पर्यंत सुमंतपद दिलें होतें व पुढें त्यास अमात्य नेमले, ते मरे (१६७२) पर्यंत अमात्य होते. त्यानंतर त्यांचा मुलगा नारोपंत १६७४ मध्यें संन्यास घेईपर्यंत अमात्य होता. पुढें रामचंद्रपंतास तें पद मिळालें. रामचंद्रपंत वारल्यावर तें पद दुसऱ्या घराण्यांत म्हणजे बाबुराव नारायण हणमंते यांस शाहू महाराजांनी दिलें. महादाजीस सन १७१४ मध्यें अमात्यपद मिळालें तें सन १७४९ पर्यंत होतें. १७२८ मध्यें हें पद भगवंतराव यास मिळाल्याचा उल्लेख सापडतो. कदाचित् तें पद कोल्हापुराकडील ही असूं शकेल. भगवंतरावास महाराजांनीं अमात्य नेमिले नाहीं. शेवटीं रामराजांनीं शिवराम रामचंद्र यास १७५० मध्यें अमात्य नेमले. हें पद पुढें या घराण्यांतच राहिलें. मात्र १८३१ मध्यें बापू कान्हो फडणीस यांजकडे हें पद दिल्याचा उल्लेख आहे. तें बहुधा गोविंद मोरेश्वरच्या कार्कीर्दीत त्यांजकडे असावें. पत्र नं. ११ हें कान्होजी अंग्रे याचें आज्ञापत्र आहे. त्याबद्दल पत्राचे खालीं टीप दिली आहे.

( ३ ) भास्करभटास आलेलीं पत्रें:—पत्र नं. १८, २३, २४, २७ हीं देवजी सोमवंशी येसाजी आटोळे, भास्करराम कोलटकर व येसाजी अनंत यांनीं लिहिलीं असून त्यांत महाराजांना कळविण्यासाठीं रघूजीसंबंधीं माहिती दिली आहे. पत्र नं. ४४ ही मोरभट व महादेवभट गुण्यांनीं रुपये पोचल्याबद्दल पावती दिली आहे हे गुणे चाफेटकर असावे. पत्र नं. ५५ ह्यावरून पासलकर घराण्याचा वैद्यांशीं जुना पुराणा संबंध दिसतो.

( ४ ) नरसिंगराव जगथापाची कर्ज फेडी संबंधाचीं पत्रें:—हीं ९ असून यांत पेशवे बाजिराव, मल्हारराम घारपुरे, कृष्णंभट व गोपाळभट नवाथे याचा संबंध आला आहे. पत्र नं. ३४, ५३ व ६४ हीं वाचलीं असतां वैद्य आपल्या ऋणकोस कशा सवलतीनें वागवीत याची कल्पना होते.

( ५ ) सावकारी हिशोब: — देवघेवीचे व्यवहार वैद्यांशीं ज्यांनीं केले त्याबद्दलचे ११ हिशोब आहेत. यांत पंतप्रधान, अनगळ, वाकडे, घारपुरे, गुणे, भाव्ये, नवाथे, सावणे, शेवडे, कुन्टे हीं घराणीं आहेत. हिशोब केल्यावर छत्रपतींना कर्ज फेड करतांना चौथाई द्यावी लागे व व्याजाच्या हिशोबांत बारोत्रा म्हणजे $\frac{1}{12}$ व्याज सोडीत असत.

( ६ ) पालेकरांचीं पत्रें:— ही ४ असून यांत कर्जरोखे दोन व हिशोब २ आहेत. पालेकर हे अगदीं नवीन घराणें आहे. तपास करतां सातार्‍यांत हे घराणें आहे असें कळतें. कर्जरोख्यांचे नमुने म्हणून २ पत्रें घेतलीं आहेत.

( ७ ) सिलकबंद:— हे ५ च घेतले आहेत. हे सुट्या कागदावर दप्तरांत पुष्कळ आहेत. हे खासगत जमाखर्च असून यांत फिरकोळ खर्च रुके व टक्के यांत दिला आहे; एकूण बेरजेंत त्याचे रुपये व आणे दिले आहेत; ४८ रुके म्हणजे १ टक्का हें प्रमाण सर्व साधारण आहे, पण रुक्याचे व टक्याचे रुपये व आणे करतांना १० रुके म्हणजे १ आणा हें प्रमाण सर्वसाधारण राहिलें नाहीं. रुक्याचे आणे करतांना घरसोड करीत असें दिसतें. एका बेरजेंत ३९ रुक्याचे ४ आणे मांडले आहेत, दुसऱ्यांत ५३ रुक्याचे ६ आणे धरलेले

आढळून येतात, टक्याचे रुपये करतांनाही एकच प्रमाण नसते. ते वरचेवर बदललें. साधारण ४ टक्के म्हणजे एक रुपया असा बाजारभाव असावा असें पुष्कळ हिशेबांवरून दिसतें. कांहीं सिलकबंदांत भास्करभटांचे मुक्काम सोनी व गोरवाड दिले आहेत.

( ८ ) लेखक न समजलेलीं पत्रें:—हीं ६ आहेत. पत्र नं. २० हें अंजनवेल व गोवळकोट घेण्यासंबंधीं महत्वाचें पत्र आहे पत्र नं. २६ व २९ हीं चिमणाजी नारायण सचिवांच्या कार्कीर्दीतील आहेत. पत्र नं. ३० यांत पहिला रघूजी व निजाम यांच्या नागपुराकडील हालचालीची सविस्तर माहिती आहे. ही माहिती दुसरे कोठें प्रसिद्ध लेखांत मला आढळून आली नाहीं. पत्र नं. ३८ यांत सचिवांच्या साहोत्र्याची यादी आहे. पत्र नं. ७१ यांत नागपूर ते काशी व बऱ्हाणपूर ते नागपूरकडे जातांना जे मुक्काम करावें लागत त्याची यादी आहे.

( ९ ) सोमवंशींचीं पत्रें:--हीं ४ आहेत. पत्र नं. ५९ ह्यांत त्रिंबकजीस काढून अप्पाजीस सरलस्कर कोणत्या अटीवर नेमावें याची यादी असून पत्र नं. ६०, ६१, ६३ यांत हैबतरावांनीं त्रिंबकजीचा वशिला महाराजांकडे लागू न देण्याबद्दल वैद्यांस विनंति केली आहे.

( १० ) बाळंभटास आलेलीं पत्रें:--पत्र नं. ५१ हें भास्करभटांनीं आजारी पडल्यावर लिहिलेलें आहे व पत्र नं. ५८ हें पटवर्धनांचे पूर्वज हरभट यांनीं लिहिलें आहे. दोन्ही पत्रांवरून वैद्यांचा महाराजांशीं व पेशव्यांशीं निकट संबंध दिसून येतो.

पत्राच्या खालीं दिलेल्या टिपांत व इंग्रजी सारांशांत पत्रांचा बराच खुलासा असल्यामुळें प्रस्तावनेंत पत्राचा खुलासा संक्षिप्त केला आहे.

पेन्शन घेतल्यावर वेळ कसा घालवावा अशी पुष्कळांस काळजी वाटते. पण मला ती वाटत नाहीं. कारण दफतरांतील कागदांत पूर्वजांच्या कृती वाचण्यांतच मी गर्क होतो. पूर्वजांच्या पराक्रमाचे कागद निराळे काढून छापणें ही पितृपूजा असून त्यांचें ऋण फेडण्याचा हा मार्ग आहे, अशी माझी भावना आहे. मी कागद वाचून त्यांची निवड केली व छापण्याची तयारी केली; पण ते कागद छापणें हा पैसे घालविण्याचा धंदा वृद्धापकाळीं कसा चालावा? ईश्वरकृपेनें संसाराची काळजी राहिली नाहीं; थोरले चिरंजीव बाबुराव ह्यांनीं स्वपराक्रमानें पुण्यांतील कागदाची गिरणी चालविण्याचें श्रेय संपादन केलें आहे. त्यांनीं माझी भावना ओळखून माझी इच्छा पूर्ण करण्याचें आनंदानें पतकरिलें आहे. याबद्दल त्यांचें कौतुक करावें तितकें थोडें आहे. साताऱ्च्या स्वतःच्या 'आनंद' छापखान्यांत हा खंड छापिला आहे. छापखान्याचे व्यवस्थापक रा. अनंतराव कुलकर्णी यांनीं आपल्याकडून छपाईचें काम सुबक व वेळेवर व्हावें याबद्दल शिकस्त केली, याचा उल्लेख करणें जरूर आहे.

पत्रांची सूची करून देण्यांत रा. कृष्णाजी विनायक पेंडसे व रा. शंकरराव जोशी यांनीं हौसेनें मदत केली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

'क्लेशः फलेन ही पुनर्नवतां विधत्ते'

मं. ल. वैद्य

# A Valuable Recent Find of the Peshwain Period.

## ( REPORT ON THE VAIDYA DAFTAR )

By:- Rao Bahadur **G. S. Sardesai, Kamshet.**

The Daftar of the Vaidya family of Wai is indeed a valuable recent find which happily promises soon to reach students of history in a printed form. The Vaidya family was for long connected with the Maratha Government and left behind full records of their operations extending over a half century Their present descendant Mr. Shankarrao Vaidya kindly allowed me to go through more than a thousand of his papers, now copied and chronologically arranged by him for printing. There is besides these still a large number of papers which he has not yet arranged and copied and which he soon wishes to do.

As Mr. Shankarrao had taken great pains in determining the dates, contents and contexts of each individual paper by referring to other available sources, my task of going through them was quite light. I discovered absolutely no mistake of dates in any of the papers that I went through, and the short summary of the contents attached to each paper proved of immense help to me.

The Vaidyas were essentially bankers and as money is the principal means for influencing politics, they wielded no small influence in the Maratha Government particularly during Shahu's regime, whose confidence they fully enjoyed. After Shahu's death, the power of the Chhatrapati declined and passed into the Peshwas' hands and Poona became the central seat of Government. The Peshwas created their own instruments of work for the administration, and the Vaidya's residence at Satara prevented them from entering into the vigorous policy of the Peshwas. They however continued to be a personagrata with the Bhosles of Nagpur, whose history is particularly illustrated in their extant papers. In addition

there are various other historical families, such as the Sachivs of Bhor, the Pratinidhis, the Patwardhans etc. whose affairs both political and financial are amply illustrated in these Vaidya records. Personal seals of prominent individuals of the Maratha times, form indeed a subject for special study and I am glad to notice vastly more seals appearing in these papers than are already known to students. This will show how very valuable these papers are for the development of national history.

As I went through the various sections arranged by Mr. Shankarrao, I have set apart a few important papers in each, as yielding some useful historical information about men and events, likely to benefit the student. A separate compilation of the papers selected by me and of those which Mr. Shankarrao might hereafter discover, can be usefully printed with suitable foot-notes in English. There are some papers which contain details of social and religious life of those days. These may be included in this compilation.

But nearly ninety percent of the Vaidya papers refer to money dealings and contain little political information. I am of opinion that if all these account papers could be separately printed and carefully edited, elucidating technical terms and operations they will supply valuable and substantial data for an exclusive thesis on " Maratha Banking ", a subject which has not yet been properly investigated Some students of the University will welcome such a production as it will yield them material for a special study given in the present unprinted form. I believe arrangements could be made for students knowing modi to study them in original and produce a thesis describing the net work of money dealings of those days, the use of hundis or drafts, how they used to be sent and paid, what interest and discount used to be charged and how the method contributed to the economics of trade and exchange.

Another minor subject of special importance which I noticed refers to the pilgrimage of Vishwanathbhat Vaidya in 1757 to the three holy places of north India in the company

of Sagunabai Peshwa. A large number of papers exists in this collection closely narrating the preparations required, the arrangements made for travel and comfort on the way, the provision of guard and money, the troubles created by the political disturbances in certain localities and similar topics which I found graphically discribed no where else. A successful pilgrimage in those days was then considered a feat as it involved a co-operation of large numbers of agencies unknown to readers of the twentieth century.

In this month's issue of the Modern Review there has appeared a * paper prepared by me on the confinement of Chandasaheb, which will illustrate the value of these Vaidya records to history. I, therefore, recommend two separate selections, one dealing with political and the other to financial matters, to one of which Mr. Shankarrao can add a short history of his worthy ancesters with a genealogical table.

**G. S. Sardesai.**

10-12-1943.

---

* हा लेख मॉडर्न रिव्ह्यूच्या डिसेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे.

# पेशवे कालीन अमोलिक नवीन दफ्तराचा शोध.

[ वैद्य दफ्तरासंबंधीं रा. ब. गो. स. सरदेसाई यांचें मत ]

[ मराठी अनुवाद ]

वाईच्या वैद्य घराण्याचें दफ्तर हा खरोखर अमोलिक नवीन माहितीचा शोध असून सुदैवानें लवकरच इतिहासज्ञास तो छापून मिळेल असें वाटूं लागलें आहे. वैद्य घराण्याचा मराठी राज्यांशीं फार दिवसाचा संबंध होता आणि त्यांच्या अर्ध्या अधिक शतकाच्या कामगिरीची माहिती देणारे कागदपत्र सांपडले आहेत. त्या घराण्यांतील हयात वंशज रा. शंकरराव वैद्य यांनीं सुमारे एक हजाराहून अधिक कागद तारीखवार लावून सध्यां छापण्यासाठी नकलून तयार ठेवले आहेत. ते त्यांनीं मला मेहेरबानीनें वाचावयास दिले. या कागदाशिवाय आणखी पुष्कळच कागद तारखा लावून त्यांच्या नकला करावयाच्या आहेत. तें काम लवकर संपवावें अशी त्यांची इच्छा आहे.

रा. शंकरराव यांनीं शक्य त्या साहित्याचा उपयोग करून प्रत्येक कागदाच्या तारखा व सारांश देण्यासाठीं व संबंध लावण्यासाठीं अत्यंत परिश्रम घेतले आहेत, यामुळें कागद पाहण्याचे माझें काम फार सुलभ झालें. मी जेवढे कागद वाचले त्यांच्या तारखांत मला कोठेंही चूक अढळून आली नाहीं आणि प्रत्येक कागदाला त्यांनीं एक कागद जोडून त्यावर कागदांतील संक्षिप्त माहिती दिल्यामुळें मला त्याचा अत्यंत उपयोग झाला.

वैद्य घराण्यांतील त्या वेळचे पुरुष हे मुख्यत्वें सावकारीचा धंदा करणारे होते व पैसा हेच राजकारभारावर परिणाम घडवून आणण्याचें साधन असल्या-मुळें वैद्यांचें मराठी राज्यांत थोडेथोडकें वजन नव्हतें. ते शाहू महाराजांच्या पूर्ण विश्वासांत असल्यामुळें विशेषतः त्यांच्या अमदानींत त्यांचे राज्यकारभारांत मोठें प्रस्थ होऊन राहिलें होतें. शाहू महाराजांचे मरणानंतर छत्रपतींची सत्ता कमी पडत जाऊन ती पेशव्यांच्या हातीं गेली, आणि पुणें हेंच राज्यसत्तेचें मुख्य केंद्र बनलें. पेशव्यांनीं राज्यकारभारासाठीं आपली स्वतःचीं नवीन साधनें तेथें निर्माण केलीं, व वैद्यांना साताऱ्यास राहून पेशव्यांच्या धडाडीच्या राजयंत्रांत भाग घेतां येईनासें झालें. असें जरी झालें, तरी नागपूरच्या भोसले दरबारीं त्यांचें

वजन कायम होतें. यांच्या बहुविध कागदपत्रांतील बरीच माहिती विशेषतः भोसल्यांच्याच इतिहासावर उजेड पाडणारी आहे. याशिवाय आणखी ऐतिहासिक अनेक घराण्यांची माहिती या दफ्तरांत आहे.उदाहरणार्थ भोरचे पंतसचीव,प्रतिनिधि, पटवर्धन वगैरे. या घराण्यांच्या राजकीय व सांपत्तिक परिस्थितीचें विस्तृत वर्णन वैद्य दफ्तरांत आहे. या दफ्तरांतील कांहीं कागदपत्रावर मराठी रियासतींतील महत्त्वाच्या पुरुषांचे शिक्के आहेत. त्यांचा विशेष अभ्यास करण्याजोगा हा एक विषय आहे. आजपर्यंत इतिहासज्ञास जे शिक्के पाहण्यास मिळाले आहेत, त्यापेक्षां पुष्कळ जास्त शिक्के या दफ्तरांत मला दिसून आले, हे नमूद करण्यास आनंद वाटतो. राष्ट्रीय इतिहासाच्या वाढीस या दफ्तरांतील कागदपत्र किती महत्त्वाचे आहेत हें यावरून दिसून येईल.

रा. शंकरराव यांनीं कालवार लावलेलीं कागदांचीं पुडकीं वाचीत असतांना मी प्रत्येक पुडक्यांतील कांहीं महत्त्वाचे कागद निराळे करून ठेविले आहेत. हे कागद इतिहासाच्या अभ्यासकास उपयुक्त वाटणारे आहेत; कारण त्यांस ऐतिहासिक व्यक्तींची व गोष्टीची उपयुक्त माहिती त्यांत मिळणार आहे. या कागदांचा व रा. शंकरराव यांस आणखी उपयुक्त सांपडणाऱ्या अशाच कागदांचा, एक स्वतंत्र भाग इंग्रजी टिपा देऊन छापला तर तो फार उपयोगी होईल. या दफ्तरांतील काहीं कागदांत पेशवेकालीन धार्मिक व सामाजिक स्थितीचें विस्तृत वर्णन आढळून येतें. त्याचाही या स्वतंत्र भागांत समावेश करतां येईल.

पण वैद्य दफ्तरांतील सुमारें ९० टक्के कागद पैशाच्या व्यवहाराचे असल्यामुळें त्यांत राजकीय माहिती फारच थोडी आहे. मला असें वाटतें कीं, हे सर्व पैशाच्या हिशोबाचे कागद निराळे छापिले व काळजीपूर्वक टिपा देऊन पारिभाषिक शब्दांचें व व्यवहारांचें स्पष्टीकरण दिलें तर मराठी राज्यांतील पेढ्यासंबंधीं एक निबंध लिहिण्यास उपयुक्त व महत्त्वाचें साधन होईल. या विषयाचें अजून योग्य तऱ्हेनें संशोधन झालेलें नाहीं. विश्वविद्यालयांतील कांहीं विद्यार्थ्यांस अशा तऱ्हेचा छापील ग्रंथ, हें एक अप्रकाशित कागदपत्रांतील विषयाचा विशेष अभ्यास करण्यास महत्त्वाचें साधन होईल. मला वाटतें मोडी वाचतां येणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां मूळ कागद पाहण्यास मिळण्याची तजवीज करतां येईल. पूर्वी पैशाचे व्यवहार कसे चालत, हुंड्याचा किंवा वरातीचा उपयोग कसा होत असे, हुंड्या किंवा वरातीं कशा पाठवीत, व त्यांचे पैसे कसे मिळत, बट्टा किंवा व्याज

यांची आकारणी कशी होत असे, व्यापारावर या पद्धतीचा काय परिणाम होत असे यांचें वर्णन देऊन एक निबंध अभ्यासकास लिहितां येईल.

दुसऱ्या एका दुय्यम प्रतीच्या पण विशेष महत्वाच्या विषयाची माहिती या कागदांत मला आढळून आली. ती अशी कीं, विश्वनाथभट वैद्य उत्तर हिंदुस्थानांतील त्रिस्थळी ( काशी, प्रयाग व गया ) ची यात्रा सन १७५७ सालीं, राणी सगुणाबाई ( जनार्दनपंताची स्त्री ) बरोबर करून आले. या यात्रे संबंधाचे पुष्कळ कागद या दफ्तरांत आहेत. यात्रेची तयारी, प्रवासांची तरतूद, वाटेंतील सुखसोई, संरक्षण व पैसा यांचा पुरवठा, या गोष्टी कशा साधाव्या लागल्या याचें इत्थंभूत वर्णन या पत्रव्यवहारांत आहे. कांहीं स्थलीं राजकीय गडबडीमुळें त्यांचेवर बिकट प्रसंग आले ते कशा तऱ्हेचे होते व त्यांतून कशी सुटका करून घेतली याची सविस्तर हकीगत पत्रांतून वाचावयास मिळते. त्याजवर आलेले प्रसंग व इतर विषय यांचें वर्णन या कागदपत्रांत जसें विस्तृतपणें दिलेलें आहे तसें मला इतर कोठेंही वाचावयास मिळालें नव्हतें. त्याकाळीं यात्रा बिनधोक पार पाडणें हें एक शतकृत्य मानलें जात असे. कारण यात्रेसाठीं कितीतरी लोकांचें सहाय्य त्यावेळीं मिळवावें लागत असे, त्याची विसाव्या शतकांतील लोकांना कल्पनाही नाहीं.

या महिन्याच्या मॉडर्न रिव्ह्यूच्या अंकांत चंदासाहेबाच्या कैदेसंबंधी माझा एक लेख आलेला आहे, तो वाचला असतां इतिहासज्ञाला वैद्य दफतराचे महत्व किती आहे तें कळून येणार आहे. म्हणून माझी शिफारस अशी आहे कीं, या दफ्तरांतील कागदाचे २ भाग करावे. एकांत राजकीय पत्रें छापावींत व दुसऱ्यांत हिशोबाचे व देवघेवीचे कागद छापावे. एका भागांत रा. शंकरराव यांनीं आपली वंशावळ देऊन त्यांपैकीं ( मराठ्याच्या राजकारणांत वावरणाऱ्या ) महत्वाच्या मान्य व्यक्तींची संक्षिप्त माहिती द्यावी.

१०।१२।१९४३ जी. एस्. सरदेसाई

# वैद्य दफ्तराबद्दल माहिती.

ही माहिती देण्यापूर्वी वैद्य हे कोठील व या कुलांत मराठी दरबारांत वावरणारी व राज्यकाराभाराचें काम करणारीं कोण माणसें होऊन गेलीं हें समजणें जरूर आहे.

वैद्य हें आडनांव धंद्यावरून पडलें आहे. यांचें मूळचें आडनांव समगोत्रावरून 'गाडगीळ' किंवा 'वझे' असावें असें प्रथमतः वाटत होतें; पण त्र्यंबकेश्वर येथीलतीर्थोपाध्यायांच्या चोपडयांत वैद्य ऊर्फ गाडगीळ असा उल्लेख असल्यामुळें 'गाडगीळ' हें मूळ उपनाम असावें असें म्हणतां येईल. वैद्यकीचा धंदा करणाऱ्या पूर्वजांनीं आपलें वास्तव्य ज्या ठिकाणीं केलें व जेथें जमीनी लागवडींत आणल्या त्या ठिकाणास 'लागवन' असें नांव देण्यांत आलें. अशा तऱ्हेनें जमीनी लागवडींत आणून जी गावें वसविलीं गेलीं, त्यांस नुसतें 'लावगन' हें नांव न देतां ज्यांनीं गांव वसविलें त्यांचें नांव 'लावगन' या शब्दास जोडून तीं गांवें संबोधण्यांत आलीं आहेत. उदाहरणार्थ, लावगन वैद्य, लावगन गद्रे, लावगन कांबळे इ. अशी 'लावगन' या नांवाचीं पुष्कळ गांवें कऱ्हाडे व देशस्थ कुटुंबांनीं वसविलीं असून तीं त्या कुटुंबांच्या नांवानें संबोधण्यांत येत आहेत. इंग्रजी अमदानींत हीं नांवें लिहितांना थोडा फरक करण्यांत आल्याचें दिसून येतें लावगन वैद्य, लावगन गद्रे असे न लिहितां वैद्य लावगन, गद्रे लावगन असें लिहितात. 'लावगन' याचा अर्थ कोशांत लागवड असा दिला आहे. यावरूनच लावगनकर असें आडनांव लिहूं लागले. लावगन हा शब्द कोणी लागवण असाहि लिहितात. त्यावरूनच लागवणकर असें आडनांव झालें आहे. या दोहोंचा अर्थ एकच आहे. वैद्य लावगन हें एक खेडेगांव तर्फ सैतवडे तालुके व जिल्हा रत्नागिरी मध्यें आहे. जयगड खाडींतून संगमेश्वराकडे जी फेरी बोट जाते, ती जांभारी व फुणगूस ही बंदरें घेते. या दोन बंदराच्या दरम्यान उजवे अंगास खाडीच्या कांठीं टेकडीवर हें गांव वसलें आहे. येथें राहणारे वैद्य हे कोकणस्थ, ऋग्वेदी, गार्ग्यगोत्री आहेत.

छत्रपती शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याचा विस्तार, पुण्यश्लोक शाहू यांच्या कारकीर्दींत अष्ट प्रधान, विशेषतः पंतप्रधान पेशवे, यांनीं अल्पावधींत सर्व भरत खंडभर केला. त्यास शिंदे, होळकर, भोसले, गायकवाड व पवार या सरदारांचें सहाय्य होतें हें नाकबूल करतां येणार नाहीं. राज्यविस्तारास लागणारीं अनेक कर्तबगार व मुत्सद्दी मंडळीही त्यावेळीं उदयास आली. अशावेळीं राज्यसंरक्षणार्थ नानाविध कार्यें उपस्थित होतात. तीं पार पाडण्यासाठीं योग्य माणसांची निवड करावी लागली. अशा असाधारण बुद्धीमत्तेच्या कर्तबगार व मुत्सद्दी माणसांत लावगनकर वैद्याचा समावेश झाला. लावगनकर वैद्यांचा मुख्य धंदा जरी वैद्यकीचा होता, तरी त्यांच्यापैकीं एक शाखा शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींत देशावर आली व तीच राजवैद्य, मुत्सद्दी व सावकार म्हणून राजदरबारीं वावरूं लागली. या शाखेपैकींच माझे पूर्वज होते, हें स्पष्ट करण्यासाठीं माझे घराण्याची वंशावळ देणें जरूर आहे; म्हणून ती सोबत जोडली आहे. या वंशावळींत ज्या पुरुषाबद्दल माहिती द्यावयाची आहे त्यांचे केवळ परस्पर नात्याचें संबंधच न देतां त्यांचे जन्म व मृत्यु ( कळले

तेवढे ) निश्चित देऊन त्यांच्या स्त्रियांचीं नांवेंही देण्याचा प्रयत्न केला आहे. जन्म, मृत्यु व स्त्रियांचीं नांवें ज्यांची कळलीं नाहींत, त्यांची जागा कोरी ठेऊन कोणास मागाहून कळल्यास त्यांत ही माहिती नोंदतां यावी अशी तजवीज केली आहे. प्रत्येक व्यक्तीची मूळ पुरुषापासून कितवी पिढी आहे हेंही वंशावळींत दिलें आहे.

पहिल्या दोन पिढींतील पुरुषाबद्दल माझ्या दफ्तरांत माहिती देणारे कागद अजून मला मिळाले नाहींत व मिळण्याची आशाही थोडीच आहे. पण रघुनाथभट ( ३ ) हे शिवकालीन होते, असें म्हणण्यास दफतरांतील ता० ४।११।१७३५ चे संभाजी अंग्र्याचे आज्ञापत्राचा आधार आहे. रघुनाथभट लावगनकर वैद्य हे कचरे गांवचे खोत होते असें लिहिलें आहे. पण हे खोती करूनच आयुष्य घालवीत होते असें म्हणतां येत नाहीं. बंदर किनारी मलबाऱ्याची धामधूम चालू असतांना ते खोती सोडून गेले. त्यांचा एक नोकर तेथे होता. भंडाऱ्यांनीं त्यास सामील करून त्यांची खोती घेतली. पुढें रघुनाथभट घाटावर येऊन कांहीं उद्योगधंदा करीत असले पाहिजेत. कारण त्र्यंबकच्या तीर्थोपाध्यायांच्या वहींत रघुनाथभट शके १६०२ च्या भाद्रपद महिन्यांत तेथ गेल्याची नोंद आहे ही त्यांचे हातची आहे. अर्थात् शिवछत्रपतीच्या मरणानंतर संभाजीचा राज्याभिषेक होण्यापूर्वीच ते नाशिक त्र्यंबकेश्वरास गेले होते. अशा तऱ्हेची घाटावर यात्रा करण्यास येणारी माणसें . सुसंपन्न असलीं पाहिजेत. ते कांहींतरी अधिकारावर असणेंही शक्य आहे. ते सन १६८७ सालीं वारल्याचा अदमासच करावा लागतो. सन १८४७ सालीं मूळपुरुषापासून आज तागायत वंशावलीच्या तपशिलाची यादी आनंद बाबूराव ( ६ ) यांनी लिहिलेली मिळाली आहे. त्यांत रघुनाथभट. मयत होऊन सुमारे वर्षें १६० झालीं असें लिहिलें आहे. संभाजी अंग्रे याच्या आज्ञापत्रांत वैद्यांनीं बंदरी धामधुमींत गांव सोडून खोतीचे काम केलें नाहीं म्हणून रु. ५० हरकी घेऊन पुनः काम करावे असा हुकूम केला आहे. हें काम अर्थात् भास्करराव (४) यांनीं पुनः स्वीकारलें किंवा नाहीं याब।। दाखला सांपडत नाही. ते जर राजदरबारीं महत्वाच्या कामावर लागले असले तर कदाचित् खोती दुसरे कोणास दिली असेल, असाच संभव दिसतो. भास्करभट ( ४ ) याचा उल्लेख पे. द. भाग ३. पत्र नं १२२, १२३, १२५ व १७४ मध्यें आला आहे. त्यावरून शाहुमहाराजाजवळ जंजिऱ्याच्या सिद्धीवरील स्वारींत सल्लागार म्हणून जे लोक होते त्यांत यांचा समावेश झालेला होता असें दिसून येतें. शाहूमहाराजांनीं यांची कामगिरी पाहून यास सन १७२७ पासून इनाम जमिनी व इनामगांवे दिल्याचे दाखले आहेत. यावरून यांची कामगिरी शाहूमहाराज गादीवर ( १७०८ ) आल्यापासूनच त्याचे लक्षांत आली असली पाहिजे. यास महाराजांनीं दिलेल्या सनदा खाली दिल्याप्रमाणें आहेत.

[१] मौजे नरवण येथील ४० बिघे पड जमीन ५।१२।१७२७

[२] मौजे लावगन येथील खार २ बिघे. १७२८

[३] कासारी दरोबस्त इनाम गांव

[४] भोर संस्थानांतील जांभळी व महुरी बुद्रुक दरोबस्त इनाम गांव.

[५] नांबिवडे येथील इनाम जमिनी.

रघुनाथभट १६८७ मध्यें वारले, तेव्हां त्यास ३ मुलगे होते. यांपैकीं पहिला मुलगा भास्करभट होय. यावरून यांचा जन्म १६७७ च्या पूर्वी केव्हां तरी झाला असावा. हे ३०।३।१७३९ रोजीं वारले, तेव्हां यांचें वय ६० हून जास्त असावे. यास भास्कर वैद्य असेंच पत्रांतून म्हटल्याचें दिसून येतें त्यांना भास्करभट असे फार थोड्या कागदांत म्हटलें आहे. यांच्या वेळचे सिलकबदाचे व इतर पत्रव्यवहाराचे कागद सांपडले आहेत. त्यांचा पहिल्या खंडांत समावेश केला आहे. हजारो रुपयांचे देवघेवीचे व्यवहार पंतप्रधान, नरसिंगराव जगथाप, मल्हारराम घारपुरे, गोपाळभट नवाथे, कृष्णंभट नवाथे, पुरुषोत्तमभट शेवडे, पासलकर, भाव्ये, आमात्य, दरवे, जेधे, दामले, अनगल, जोशी, वाकडे वगैरे—सारख्या सावकार व श्रीमंत लोकांशीं केल्याचे पुष्कळ जमाखर्च दफतरांत आहेत. भास्करभट वारल्यावर साधारण एक वर्षानींच बाजीराव् पेशवे २८।४।१७४० रोजीं वारले. शाहुमहाराजांनीं त्यास रघूजी भोसल्यास आणण्याकरितां नागपुरास १७३५ सालीं पाठविले होते. यावरून वैद्य घराण्याचा भोसले दरबाराशीं इतका जुना संबंध होता असें दिसून येईल. भास्करभटाचा उल्लेख सरदेसाई घराण्याच्या वृत्तांतांत आलेला आहे.

वाळंभट व विश्वनाथभटः— [४] हे भास्करभटाचे धाकटे बंधु. भास्करभट १७३९ सालीं वारल्यावर बाजीरावाचे कारकीर्दींत या दोघांनीं वडील बंधूंची कामगिरी अंगावर घेतली, ती पानपत संग्रामापूर्वींच संपुष्टांत आली; कारण संग्राम होण्यापूर्वीच दोघे दिवंगत झाले व त्यांची कामगिरी पुढें त्यांचे चिरंजीवांनीं उचलली.

पेशवे दफतरांतील भागांत बाळंभटांचें नांव २–३ ठिकाणींच आढळून येतें. तसेंच विश्वनाथभटांचें नांव भाग २० मध्यें व आणखी कांहीं भागांत भोसले दरबारी महत्वाची कामगिरी केल्याबद्दल आलेलें आहे. पण त्यावरून ह्या दोघांच्या कामगिरीचें ऐतिहासिक महत्व काय हें कळत नाहीं. आमच्या दफतरांतील कागदांत या दोघांनां लिहिलेलीं पुष्कळ पत्रें आहेत. पत्र लेखकांची कांहीं नांवें पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत. शाहूमहाराज, पंत प्रधान, नागपूरचे भोसले, सोमवंशी सरलस्कर, मंत्री, चिटणीस, पोतनीस, अंग्रे, दाभाडे, पंतआमात्य सकवारबाई, सगुणाबाई, ताराबाई इ. ह्यांपैकीं बरींच पत्रें अस्सल सहीशिक्याचीं व कांहीं नकला म्हणून आहेत. त्यावरून शाहू महाराजास सांगून ते या लोकांचीं कामें करून देत, असें दिसते. हे सर्व लोक 'तुम्ही आमचे वकील आहात, आम्हास काळजी नाहीं.' असें पत्रांत लिहितात. यास आलेलीं पत्रें, चंदासाहेबाची कैद, बंगालवर रघूजीच्या स्वाऱ्या, अंग्रे बंधूंची महाराजाशीं तुटक व सलगीची वृत्ति, भास्करराम कोलटकराची शूर वृत्ति, पंतसचीव, पंत प्रतिनिधी व मुरारराव घोरपडे यांचा महाराजाशीं संबंध, वगैरे गोष्टीवर नवीन उजेड पाडणारीं आहेत बाळंभटजी, विश्वनाथ भटाहून वडील असले तरी पत्रव्यवहार वाचल्यावर त्यांची मुत्सेद्देगिरी धाकट्या भावापेक्षां कमीच दिसून येते. दोघा बंधूंचा एकोपा विलक्षण आहे व संपत्ति पुष्कळ असून ते आपल्या हयातींत विभक्त झाले नाहींत. ही विशेष गोष्ट आहे. दोघेहि अत्यंत धार्मिक होते. त्यांनीं कोकणांत लागवनवैद्य, लागवनगद्रे, नरवण, बरवडे, रीळ, मालगुंड, देऊड, कोळिसरे या गांवीं देवालयें बांधलीं व देवावर, महुरी बुद्रुक येथें अमृतेश्वर देवालय, घोमच्या घाटाच्या पायऱ्या, नरसोबाचा मंडप, वाईपासून जोरखिंडीपर्यंत सडकेचे बाजूस आंब्याची व इतर झाडांची लागवड, लक्ष भोजनें ह्या गोष्टी हजारो रुपये खर्चून केल्याचे कागदपत्र आहेत. विश्वनाथ भटाची ११ वर्षांची काशीयात्रा कशी झाली याचें सविस्तर वर्णन कागदपत्रांत आहे.

( पुढील मजकूर पान १५ वर पहा )

# इतिहास प्रसिद्ध लावगनकर वैद्य घराण्याची वंशावळ




= या चिन्हापुढील नांव बायकोचें आहे.

७

विश्वनाथभट

[ यांचा वंश १२ व्या पानावर आहे ]

रामभट

जन्म { ज्ये. शु. ३।१६६४
२५।५।१७४२ }

मृत्यु { पौ. शु. ३।१६९०
११।१।१७६९ वाईस }

= जानकीबाई (दामले)

कृष्णराव

[ यांचा वंश १४ व्या- पानावर आहे]

भास्करराव उर्फ बापू ( संन्याशी )

जन्म स १७६१

मृत्यु फा. शु.२।१७४९ } अरुणाचल

= १७।२।१८२८ } पर्वती

चिंतामण उर्फ दाजी

जन्म स. १७८९

मृत्यु मार्गशीर्ष शु. १७५९ } वाईस
५।११।१८१७ }

= जानकीबाई

अन्नपूर्णाबाई (सरंजामे)

४ विश्वनाथ रघुनाथ

जन्म

मृत्यु श्रा. व. ५।१६८२ / २३।३।१७६० } वाईस.

= उमाबाई मृ. वै. शु. ७।१७१४, १३।५।१७९२

५ बाबूराव (संन्याशी)

जन्म स. १७४२

मृत्यु अश्विन शु. १४।१७१७ / २७।१०।१७९५ } टोक्यास

= { अन्नपूर्णा (साठे) / रमाबाई ऊर्फ आक्काबाई (जोग) }

काशिराव ऊर्फ काशिनाथ

जन्म { मार्ग. व. ७।१६७९ / १।१।१७५८ }

मृत्यु { चै. शु. २।१७१३ / ५।४।१९९१ }

= भागीरथी (सती)

नक्कल

६ नारायणराव ऊर्फ दादासाहेब (संन्यासी)

जन्म पौष व. १३।१६९० / ४।२।१७६९

मृत्यु भाद्र. व. १३।१७५० / ६।१०।१७२८ वाईस

माधवराव

जन्म

मृत्यु माघ १७१५

७ = लक्ष्मीबाई मृ. ६।१२।१८३३

= राधाबाई

नक्कल

८

९

*हयात व्यक्तिपुढें हें चिन्ह आहे.

आनंद बाबूराव (संन्याशी)

जन्म | सन १६९९
मृत्यु | माघ व. ८।१७७३ } काशीस
३।१२।१८५२
= | साळूबाई (शारंगपाणी)
उमाबाई ऊ. काकूबाई मृ. २४।१२।१८७४

माधवराव ऊर्फ तात्यासो दत्तक आला (संन्याशी)

जन्म | सन १८२२
मृत्यु | का. शु. ५।१७९७
३।११।१८७५
= | रमाबाई (आपटे)

रामकृष्ण माधवराव ऊर्फ नानासो.

जन्म | अश्वीन व. ८।१७६७
२३।११।१८४५
मृत्यु | फा. शु. २।१८४६ } पुण्यास
८।३।१९२४
= | लक्ष्मीबाई (भानू)

गणेश अनंत दत्तात्रय* वासुदेव*

लक्ष्मण ऊर्फ आण्णासो.

जन्म | आषाढ व. १०।१७७२
३।८।१८५०
मृत्यु | माघ व. ४।१८४८ } वाईस
१२।२।१९२५
= | राधाबाई (भारपुरे)
मृ. भाद्र. व. ७।१८६२

शंकर*

५ कृष्णराव ऊर्फ तात्या ( संन्याशी )

जन्म | मार्ग. व. १४।१६७२ }
१६।१२।१७५० }

मृत्यु | का. शु. ३।१७४९ }
२३।१०।१८२७ } काशीस

= | रखमाबाई (रुकमिणीबाई) ऊर्फ ताई (दाभोळकर) ( सती )

६ रघुनाथराव ऊर्फ दादा

जन्म | मार्गशीर्ष वद्य ८।१६९२ }
१०।१२।१७७० }

मृत्यु | माघ वद्य ११।१७१८ }
२२।२।१७९७ } नांदिवड्यास

= | आनंदीबाई (पटवर्धन) ऊर्फ मैनाक्का ( सती )

७ विश्वासराव ऊर्फ बाबा

जन्म | मार्ग. व. ४।१७१३ }
१२।१२।१७९१ } तासगांवीं

मृत्यु | मार्ग. व. ८।१७४७ }
१।१।१८२६ } तासगांवीं

= | गंगाबाई ऊर्फ व्यंकूबाई (कोलटकर)

८ व्यंकटराव ऊर्फ बापूसाहेब

|

९ रघुनाथ

|

१० व्यंकटराव

|

११ विनायक* दत्तक आला

**भिकंभट:-** ( ५ ) हे बाळंभटाचे वडील चिरंजीव होत. यांच्या बाईचें नांव गंगाबाई ऊर्फ जाईबाई असावे. ही बाळंभटाची पहिली बायको. भिकंभटासंबंधीं प्रसिद्ध कागदपत्रांत कोठेंच उल्लेख नाहीं. ऐतिहासिक, मुत्सद्दी किंवा कर्तबगार माणसांत त्यास घालतां येत नाहीं. त्यास ताराबाईनी पांडवगडचे किल्लेदाराचे हाताखालीं नेमून त्यासाठीं आसामी दिली होती असे कागद आहेत. विश्वनाथभटांनीं नागपुराकडे व काशीस गेल्यावर इकडील देवघेवीचे व्यवहार कसें करावे, या बद्दल व घरगुती कामा-संबंधीं त्यास लिहिलेलीं पुष्कळ पत्रें आहेत. हे वडील वारल्यावर ३ वर्षे होते व विश्वनाथभट जिवंत असतांनाच १६।४।१७५९ रोजीं वारले.

**रामचंद्र बल्लाळ** ( ५ ) ऊर्फ रामभट हे भिकंभटाचे सहोदर बंधू होत. ह्यांची पुष्कळ पत्रें व जमाखर्च दफ्तरांत आहेत. भिकंभट १७५९ मध्यें व विश्वनाथभट १७६० मध्यें वारले. त्यानंतर रामभट व बाबूराव ह्यांचा कारभार सुरू झाला. रामभट जरी बाबुरावापेक्षां वडील होते तरी बाबुरावांची मुत्सदेगिरी त्यांमध्यें नव्हती. यांच्या बद्दल प्रसिद्ध कागदपत्रांत कोठें उल्लेख आढळत नाहीं. ते १।११।१७६९ रोजीं वाईस वारले. यांनीं आपल्या हयातींत आपली मिळकत बाबुरावापासून १७६४ मध्यें निराळी करून घेतली. त्या वाटणीचे इत्थंभूत कागद आहेत दोघांत एक समाईक वृत्ती होता. तो बाबुरावानीं थोरले माधवरावास बक्षीस दिल्यावर त्याचे किमतीच्या वाटणीबद्दल नाना फडणिसांचा व रामभटांचा १७६७ सालीं गमतीदार पत्रव्यवहार झालेला आहे. विश्वनाथ-भटांनीं व बाळंभटांनीं सचीव, पंतप्रधान, वगैरेस दिलेलीं कर्जे वसूल करण्या बद्दल खटपट यांनीं केल्याचे पुष्कळ कागद दफ्तरांत आहेत.

**कृष्णराव ऊर्फ बळवंतराव तात्या** ( ५ ) हे बाळंभटाची दुसरी बायको सरस्वती इचे चिरंजीव होत. यांना एक बहीण होती. तिचें नांव अनूबाई. ही गंगाधर भिकाजी रास्ते याजला दिली होती. कृष्णरावास ८ मुली होत्या. त्या श्रीमंत सरदार घराण्यांत दिल्या होत्या. ढमढेरे, गोडबोले, परचुरे, सातारकरजोशी, वाईचे सावकार साठे, पेठे, रास्ते व कानिटकर अशा लोकांशीं त्यांचा संबंध आल्यामुळें त्यास सांसारिक कृत्यें कर-ण्यांतच पुष्कळ वेळ व द्रव्य खर्च करावें लागलें. द्रव्यप्राप्तीसाठीं संबंधी लोकांच्या सहाय्यानें त्यांना लोकांकडील कर्जे वसूल करणें व नवीन व्यवहार चालू ठेवणें, मामलती मिळविणें या गोष्टी कराव्या लागल्या. हे महुरो, जांभळी, कान्हाटी, कासारी व नांदिवडे या इनाम गांवीं वरचेवर वसुलीसाठीं जात असत. कृष्णरावास एकच रघुनाथरावदादा म्हणून मुलगा होता. यास परशुराम भाऊ पटवर्धन यांनीं आपली मुलगी मैना ( आनंदी ) बाई दिली होती. लग्न तासगांवीं सन १७७८ मार्च मध्यें मोठ्या थाटांत झालें. सदाशिव अनंत अभ्यंकर हे साताराचे फडणीस होते. ते वारल्यावर कृष्णराव यास २६।६।१८०१ रोजी फडणीस नेमल्याचा हुकूम झाला हे सकुटुंब काशीस गेले होते. तेथें का. शु. ३।१७४९, २३।१०।१८२७ रोजीं वारले, बायको रखमाबाई सती गेली.

**बाबूराव विश्वनाथ** (५) हे जरी रामभटापेक्षां लहान होते, तरी राजकारणपटुता त्यांचे ठायीं चांगली होती. प्रसिद्ध कागदांत माधवराव व नारायणराव पेशवे यांच्या कारकीर्दीत यांच्या कामगिरीचे उल्लेख फारसे नाहींत. आमच्या दफ्तरांतील कागद पहावरून नाना

५ कृष्णराव ऊर्फ तात्या ( संन्याशी )

जन्म | मार्ग. व. १४।१६७२ } १६।१२।१७५०

मृत्यु | का. शु. ३।१७४९ } २३।१०।१८२७ } काशीस

रखमाबाई (रुकमिणीबाई) ऊर्फ ताई (दाभोळकर) ( सती )

६ रघुनाथराव ऊर्फ दादा

जन्म | मार्गशीर्ष वद्य ८।१६९२ } १०।१२।१७७०

मृत्यु | माघ वद्य ११।१७१८ } २२।२।१७९७ } नांदिवड्यास

= | आनंदीबाई (पटवर्धन) ऊर्फ मैनाक्का ( सती )

७ विश्वासराव ऊर्फ बाबा

जन्म | मार्ग. व. ४।१७१३ } १२।१२।१७९१ } तासगांवीं

मृत्यु | मार्ग. व. ८।१७४७ } १।१।१८२६ } तासगांवीं

= | गंगाबाई ऊर्फ व्यंकूबाई (कोलटकर)

८ व्यंकटराव ऊर्फ बापूसाहेब

|

९ रघुनाथ

|

१० व्यंकटराव

|

११ विनायक* दत्तक आला

**भिकंभटः**– ( ५ ) हे बाळंभटाचे वडील चिरंजीव होत. यांच्या आईचें नांव गंगाबाई ऊर्फ जाईबाई असावे. ही बाळंभटाची पहिली बायको. भिकंभटासंबंधीं प्रसिद्ध कागदपत्रांत कोठेंच उल्लेख नाहीं. ऐतिहासिक, मुत्सद्दी किंवा कर्तबगार माणसांत त्यास घालतां येत नाहीं. त्यास ताराबाईनीं पांडवगडचे किल्लेदाराचे हाताखालीं नेमून त्यासाठीं आसामी दिली होती असे कागद आहेत. विश्वनाथभटांनीं नागपुराकडे व काशीस गेल्यावर इकडील देवघेवीचे व्यवहार कसें करावे, या बद्दल व घरगुती कामा-संबंधीं त्यास लिहिलेलीं पुष्कळ पत्रें आहेत. हे वडील वारल्यावर ३ वर्षें होते व विश्वनाथभट जिवंत असतांनाच १६।४।१७५९ रोजीं वारले.

**रामचंद्र बल्लाळ** ( ५ ) ऊर्फ रामभट हे भिकंभटाचे सहोदर बंधू होत. ह्यांची पुष्कळ पत्रें व जमाखर्च दप्तरांत आहेत. भिकंभट १७५९ मध्यें व विश्वनाथभट १७६० मध्यें वारले. त्यानंतर रामभट व बाबूराव ह्यांचा कारभार सुरू झाला. रामभट जरी बाबुरावापेक्षां वडील होते तरी बाबुरावांची मुत्सदेगिरी त्यामध्यें नव्हती. यांच्या बद्दल प्रसिद्ध कागदपत्रांत कोठें उल्लेख आढळत नाहीं. ते १।११।१७६९ रोजीं वाईस वारले. यांनीं आपल्या हयातींत आपली मिळकत बाबुरावापासून १७६४ मध्यें निराळी करून घेतली. त्या वाटणीचे इत्थंभूत कागद आहेत दोघांत एक समाईक हत्ती होता. तो बाबुरावानीं थोरले माधवरावास बक्षीस दिल्यावर त्याचे किमतीच्या वाटणीबद्दल नाना फडणिसांचा व राभटांचा १७६७ सालीं गमतीदार पत्रव्यवहार झालेला आहे. विश्वनाथ-भटांनीं व बाळंभटांनीं सचीव, पंतप्रधान, वगैरेस दिलेलीं कर्जे वसूल करण्या बद्दल खटपट यांनीं केल्याचे पुष्कळ कागद दफ्तरांत आहेत.

**कृष्णराव ऊर्फ बळवंतराव तात्या** ( ५ ) हे बाळंभटाची दुसरी गायको सरस्वती इचे चिरंजीव होत. यांना एक बहीण होती. तिचें नांव अनूबाई. ही गंगाधर भिकाजी रास्ते याजला दिली होती. कृष्णरावास ८ मुली होत्या. त्या श्रीमंत सरदार घराण्यांत दिल्या होत्या. ढमढेरे, गोडबोले, परचुरे, सातारकरजोशी, वाईचे सावकार साठे, पेठे, रास्ते व कानिटकर अशा लोकांशीं त्यांचा संबंध आल्यामुळें त्यास सांसारिक कृत्यें कर-ण्यांतच पुष्कळ वेळ व द्रव्य खर्च करावें लागलें. द्रव्यप्राप्तीसाठीं संबंधी लोकांच्या सहाय्यानें त्यांना लोकांकडील कर्जे वसूल करणें व नवीन व्यवहार चालू ठेवणें, मामलती मिळविणें या गोष्टी कराव्या लागल्या. हे महुरो, जांभळी, कान्हाटी, कासारी व नांदिवडे या इनाम गांवीं वरचेवर वसुलीसाठीं जात असत. कृष्णरावास एकच रघुनाथरावदादा म्हणून मुलगा होता. यास परशुराम भाऊ पटवर्धन यांनीं आपली मुलगी मैना ( आनंदी ) बाई दिली होती. लग्न तासगांवीं सन १७७८ मार्च मध्यें मोठ्या थाटांत झालें. सदाशिव अनंत अभ्यंकर हे सातारचे फडणीस होते. ते वारल्यावर कृष्णराव यास २६।६।१८०१ रोजी फडणीस नेमल्याचा हुकूम झाला हे सकुटुंब काशीस गेले होते. तेथें का. शु. ३।१७४९, २३।१०।१८२७ रोजीं वारले, बायको रखमाबाई सती गेली.

**बाबूराव विश्वनाथ** (५) हे जरी रामभटापेक्षां लहान होते, तरी राजकारणपटुता त्यांचे ठायीं चांगली होती. प्रसिद्ध कागदांत माधवराव व नारायणराव पेशवे यांच्या कारकीर्दींत यांच्या कामगिरीचे उल्लेख फारसे नाहींत. आमच्या दफ्तरांतील कागद पत्रावरून नाना

फडणीस व बाबूराव हे समकालीन व समवयस्क असून राजदरबारीं शिरण्याचा दोघांचा उपक्रम थोरले माधवरावांच्या कारकीर्दीतच झाला असें दिसून येतें. नाना फडणीस पानपतावर गेले होते, पण बाबूराव तिकडे गेल्याबद्दल कांहीं माहिती लागत नाहीं. राक्षसभुवनच्या लढाईंत ते होते. निजामानें पुणें जाळलें व महाराष्ट्र लुटलें, त्याची झळ यास लागली होती. यांनी माधवरावास हत्ती बक्षीस दिला होता व बरेंच कर्जही दिलें होतें. राघोबा व माधवराव यांचा तंटा मिटविण्याचे कामीं यांचे अंग असावें. माधवरावांनीं मरण्यापूर्वी लोकांच्या कर्जातून मुक्त होण्यासाठीं पुष्कळ सवलती दिल्या होत्या. त्यांत कृष्णराव व बाबुराव यांचे कर्ज देण्याचाही निर्णय झालेला होता. बाबुरावांनीं व्याजाची आशा न धरता रोख रक्कम घेतली व कृष्णरावांनीं व्याज मिळविण्याचा प्रयत्न केला. भोसल्याकडील वकिलीचे कामावर महाराष्ट्रांतील धामधुमीमुळें वडील मरतांच जातां आलें नाहीं, म्हणून जानोजी भोसले यांनीं वडिलांचे वकिलीचे कामावर येण्याबद्दल यांस पत्रें पाठविलेलीं दफतरांत आहेत.

सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत बारभाईचा कारभार नाना फडणीस यांनीं आपले हातीं घेतल्यावर त्यास बाबुरावांचा फार उपयोग झाला. नाना फडणीसांचा बाबुरावावर किती विश्वास होता हें बाबुरावांनीं माधवरावास दिलेल्या हत्तीचें प्रकरण व दिवाकरपंत चोरघोडे यांची दुटप्पी वर्तनाबद्दल केलेली कानउघाडणी, यांचा पत्रव्यवहार वाचला असतां कळून येणार आहे. दिवाकरपंतास बाबुरावांच्या वकिलीची इतकी जरब बसली कीं, त्यानें १७७९ च्या पेशव्याशी केलेल्या तहांत अशी अट घातली कीं, बाबुरावांच्या जागीं दुसरा वकील नेमावा. नाना फडणीसांनीं ही अट कबूल करून त्यांच्या जागीं सदाशिवराम गुणे यास १७८० सालीं वकील नेमले. ते १७९० पर्यंत तेथें वकीलीचें काम करीत होते. पण पुढें टिपूवर स्वारी करण्यासाठीं भोसल्याकडून येणारी मदत गुणे यास मिळवितां येणार नाहीं असें वाटून नानांनीं बाबूराव यांस पुन: वकिलीचें काम दिलें. योगायोग असा कीं, बाबूराव नागपूरास पोचून कामास सुरवात करतात इतक्यांत गुणे हे नागपूराकडे येतांना वाटेंतच वारले. भोसल्याकडून कर्नाटकांत मदत पाठविण्याचें काम बाबूरावांना डोईजडच होतें. पण त्यांनीं आपल्या मुत्सद्दीपणाचा उपयोग करून नाना फडणविसाकडून भोसल्यास अशी कडक पत्रें पाठविलीं कीं, भोसल्यास शेवटीं असें म्हणावें लागलें कीं, ' बाबूराव, तुमच्या विरुद्ध जाऊन आमचे चालणार नाहीं. ' यासंबंधाचें बरेच कागद पारसनीस संग्रहांत आहेत. सन १७८० ते १७९० पर्यंत बाबूरावांना नानासाहेबांनीं दोन मोठ्या कामगिऱ्या दिल्या होत्या. अहिल्याबाई होळकर व निजाम याजकडील येणे पैशाचा हिशेब करणें. त्यास इतर कामेंही दिलीं होतीं. ते १७८५ मध्यें काशीस गेले असतां ते परत कधीं येणार म्हणून नाना फडणीस वरचेवर चौकशी करीत होते. यावेळीं नाना फडणिसांनीं बाबूरावांचे चिरंजीव नारायणराव यास कर्नाटकच्या स्वारींत नेले होते.

बाबूराव नागपूराकडे वकिलीचें कामावर १७९० नंतर असतांना त्यांनीं आपले दोघे चिरंजीव नारायणराव व माधवराव यास राजकीय शिक्षण देण्यासाठीं नाना फडणिसांच्या हाताखालीं ठेविले होते. याबद्दलचे कागद पारसनीस संग्रहालयांत आहेत. सन १७९१ मध्यें रघुनाथ चिमणाजी सचीव वारल्यावर शंकराजी रघुनाथ यांचा कारभार आपणास मिळविण्याचा बाबुरावांचा प्रयत्न होता. पण नानासाहेब यास दुसरी महत्वाची कामें त्यांजकडून करून घ्यावयाची होती, यामुळें त्यांचे प्रयत्नास यश आलें नाहीं.

निजामाच्या हिशोबाचें काम यांनीं उरकल्यावर निजाम पैसे देण्यास कबूल होईना यामुळें खर्ड्याची लढाई झाली. या लढाईच्या तयारीचें काम जरी परशुरामभाऊ करीत होतें, तरी बाबूरावांनाही नानाफडनिसांनीं आपलेबरोबर लढाईवर नेले होते. भोसल्याना दिलेलें काम करून घेण्याचें बाबुरावावरच पडलें होतें. लढाई संपल्या वर त्यांची प्रकृति बरी नसल्यामुळें ते वाईस गेले.

बाबुरावांचे वडिलापासून सचिवांना कर्जे देण्यांत आलीं होतीं, तीं फेडून घेण्यासाठीं नानाफडणिसामार्फत बाबुरावांनी हप्तेबंदी करून घेतली होती; पण त्या प्रमाणें वसुली झाली नाहीं.

सन १७९५ मध्यें बाबूराव, श्रीधर लक्ष्मण मुनशी, व कृष्णराव माधव चिटणीस यांमध्यें एक करारनामा झाल्याचा कागद मिळाला आहे. तिघांनीं नागपुराकडे मिळविलेली संपत्ति एकत्र करून समान वाटून घ्यावी, असा तो करार आहे. हा करार झाल्यावर बाबूराव लवकरच वारले, तरी दुसऱ्या दोघांनी करारा प्रमाणें त्यांचे चिरंजीव नारायणराव यास संपत्ति दिल्याचे कागद आहेत. बाबुरावांस भोसल्यांनीं वायगांव व मुडगांव ही दोन गांवें व कांहीं हक्क दिले होते ते सर्व शेवटच्या बाजीरावांच्या कारकीर्दीत संपुष्टांत आले. बाबुराव हे सवाई माधवराव २७।१०।१७९५ रोजीं वारले, त्या दिवशींच टोक्यास संन्यास घेऊन समाधिस्थ झाले. पुण्यास बुधवारांत ठकाराचे राममंदिरास लागून त्यांचा राहता वाडा होता व काळचा वावरांत नाना फडणिसाच्या बागेजवळ यांची बाग व बंगला होता. तेथे ते नानाफडणीस आंपल्या बागेंत राहण्यास गेले असतां राहण्यास जात असत.

रघूजी भोसल्यास मुलगा झाला ही बातमी कळतांच त्यांनीं लक्ष्मण बल्लाळ यांस पत्र लिहून स्वराज्य व हिंदुधर्मस्थापना यांस आतां जोर मिळेल असें अभिमानयुक्त व आनंदभरित भाषेंत पत्र लिहिले होते तें मी केसरी पत्रांत पूर्वीच प्रसिद्ध केलें आहे. शिवाजी महाराजांचें ध्येय १०० वर्षानंतर बाबुरावासारख्या मुत्सद्याच्या तोंडून आनंदाच्या उकळ्या येऊन बाहेर पडतें ही गोष्ट त्यावेळच्या राजकारणी पुरुषाच्या मनांतील विचारांचें द्योतक नाहीं असें कोण म्हणेल ?

काशिराव विश्वनाथ (५) हा बाबुरावांचा धाकटा भाऊ, विश्वनाथभट १७५७।५८ सालीं काशीस गेले होते तेव्हां जन्मास आला. म्हणूनच त्यास काशिराव नांव ठेविलें. याची राजकीय कामगिरी सांगण्यासारखी नाहीं. हा बाबुराव नागपुराकडे असतांना ५।४।१७९१ रोजीं वारला. याची बायको भागिरथी सती गेली. याची पुढें संतति नाहीं.

भास्करराव रामचंद्र (६) हे रामभटाचे चिरंजीव व परशुरामभाऊ पटवर्धनांच्या जावयाचे सख्खे चुलतबंधु. हे भाऊसाहेब यांचे बरोबर सन १७९१ मध्यें टिपूशीं श्रीरंगपट्टणास लढाई देण्यापूर्वी धारवाडास गेले होते. भाऊसाहेब यांनीं धारवाडचा किल्ला हस्तगत केल्याची हकीगत यांनीं आपल्या पत्रांत लिहिली आहे. हे एक लढवय्ये होते. हे सन १७९२ सालीं त्यांची सावत्र आजी सरस्वतीबाई इजबरोबर काशीस गेले होते. तिकडे यात्रा करीत असतां अरुणाचल पर्वती ७।२।१८२८ रोजीं वारले.

रघुनाथकृष्ण (६) हा कृष्णरावतात्यांचा एकुलता एक मुलगा भाऊसाहेब पटवर्धनांचा जावई. भाऊसाहेब यांनीं जावयास १७९१ सालीं श्रीरंगपट्टणचे लढाईवर

नेले होते व खर्ड्याच्या लढाईवर सन १७९५ सालीं ते स्वयंस्फूर्तीनें वडिलांची आज्ञा घेऊन गेले होते. त्यानंतर त्यांनीं त्यास भाऊंच्या वशिल्यानें पेशव्याकडून कांहीं तालुक्याची मामलत मिळविण्याचा प्रयत्न केला. पुढें त्यांची प्रकृती नादुरुस्त होऊन ते जयगडा जवळील नांदिवडें गांवीं मरण पावले. याची स्त्री मैनाक्का (आनंदीबाई) सती गेली.

नारायण बाबुराव ( ६ ) यांस नाना फडणिसानीं आपल्या हाताखालीं वडिलांच्या विनंतिवरून खाजगी चिटनिशीच्या कामावर ठेविले होते. यामुळें त्यांस राजकीय व्यवहाराची चांगली माहिती झाली होती. वडिलांनी यांना व दुसरे दोघे मुलांस नागपुरास नेऊन तेथील दरबारची माहिती करून दिली होती. बाबुराव १७८५ सालीं काशीस गेल्यापासून यांना नानांच्या हाताखालीं काम करण्याचा प्रसंग आला. खर्ड्याच्या लढाईचे वेळीं हे वडिलाबरोबर नानांच्या डेऱ्यांत होते. यांची तेथून आलेलीं कांहीं पत्रें पारसनीस दफतरांत आहेत. बाबुराव १७९५ मध्यें वारल्यावर रावबाजीच्या कार्कीर्दीत आपल्या सलामसलतींत नारायणरावदादांना नानांनीं घेतले होते. पे. द. भा. ४१. १६, १७ या पत्रांत नाना काळेनावरांतील बाणेंत नारायण बाबुराव याजपाशीं २ दिवस लागोपाठ राजकीय पेचप्रसंगाचें खलबत करीत होते, अशा आशयाचा मजकूर आहे. नानांच्या पक्षांतील असल्यामुळें यांस किती कल्पनातीत त्रास भोगावा लागला याचें वर्णन म रि. उ. वि. ३ पान १४३ मध्यें भरपूर दिलें आहे. नारायणराव दादांना कैद तर झालीच आणि इतरांप्रमाणें त्यास घाटगेशाईत चाबुकाचाही मार खावा लागला. नानांना मुकीरनें फसवून कैद केले, तेव्हां त्याज बरोबर जीं माणसें होतीं त्यांसही अटकेंत टेविले. त्यांत नारायणराव होतेच. नाना वारल्यांवर त्यांच्या बायकोच्या मांडीवर दत्तक देण्याची खटपट करणाऱ्यांस पकडण्यांत आले. त्यांत नारायणरावदादाही सांपडले. शेवटच्या बाजिरावाच्या कारकीर्दींत होळकरी, शिंदेशाई व घाटगेशाई यांना चांगलीच भोंवली. त्याची हकीगत म. रि. उ. वि. भाग ३ मध्यें वांचावयास मिळेल. पुढें ३१।१२।१८०२ रोजीं वसईचा तह रावबाजीनीं इंग्रजाशीं केला त्यावेळीं बाजिरावाबरोबर वसईस जी मडळी होती त्याची नांवनिशी पाहिली तर त्यांत नारायणरावदादाचें नांव आहे. यामुळें अशी शंका येणें सहाजिक आहें कीं, बाजिरावाबरोबर असलेली मंडळीं बाजिरावांच्या मताची व त्यास तैनाती फौजेस संमती देण्यास भाग पाडणारी असावी. इतर कागदपत्रावरून असें दिसतें कीं, तह करण्याचे वेळीं वर दिलेली मंडळी होतीच असें सांगतां येत नाहीं. नारायणरावदादांच्या पुढील वर्तनावरून ते तैनाती फौजेस अनुकूल नव्हते असें निश्चित म्हणतां येतें. कारण इंग्रजांशीं तह झाला हें कळविण्यासाठीं बाजिरावांनीं वसईहून भोसल्याकडे नारायणरावदादांस पाठविले, तेव्हां काय तह झाला व त्यांतील अटी काय होत्या हें त्यांस मुळींच सांगितलें नव्हतें. रावबाजी आपले यजमान, ते हुकूम देतात, म्हणून नारायणराव भोसल्याकडे गेले. पण ते त्यांस तहाचीं बातमी देऊन गप्प बसले नाहींत. त्यांनीं शिंदे, होळकर व भोसले यांची चांदवड येथें आगस्ट १८०३ मध्यें बाबा फडके, वगैरे मुत्सद्यांच्या सहाय्यानें जूट घडवून आणण्याचा व इंग्रजांस तोंड देण्याचा प्रयत्न केला. ही गोष्ट अर्थात् बाजिरावास न रुचणारीच होती. या वाटाघाटींत भोसल्यांनीं नारायणरावदादांस विचारलें कीं, पंतप्रधानांनीं तह तरी काय केला तें सांगा. तेव्हां नारायणरावास तहाचा तपशील ठाऊक नसल्यामुळें, भोसले तहाचा तपशील मागतात, असें पुनः बाजिरावांना लिहावें लागलें. नारायणरावदादांनीं

बाजिरावास तैनाती फौज कबूल करा असा सल्ला दिला असता तर तोच सल्ला त्यांनीं भोसल्यास दिला असता. पण त्यांनीं त्यास उलट सल्ला दिला व त्याप्रमाणें रघूजींनी देगावच्या तहांत तैनाती फौजेस समिति दिली नाहीं. असें नारायणरावदादांना त्यांनीं ता. २७।१२।१८०३ रोजीं लिहिलेल्या पत्रावरून स्पष्ट दिसून येतें. हें पत्र राजवाडे खंड १० मध्यें छापिलें आहे. रघूजी हयात असेपर्यंत त्यानें इंग्रजांच्या डावपेचास भीक न घालतां ती फौज आपल्यावर लादून घेतली नाहीं. सन १८१६ त परसोजी कडून इंग्रजांनीं मध्यरात्रीं तैनाती फौजेस समति लिहून घेतली. याकामीं इंग्रजांस मदत करणारे भोसले दरबारचेच फितूर लोक होते व यांपैकीं मुख्य आप्पासाहेब भोसले व यशवंत दादो होते व तेच पुढे नारायणरावदादांचे विरुद्ध त्या दरबारीं कारस्थाने करीत होते. त्यांचें उत्पन्न खालसा करण्यास तेच कारणीभूत झाले. नारायणरावदादांना बाजीरावाच्या पळपुटया स्वभावाचा तिटकारा आलाच असला पाहिजे. त्याचे बरोबर पदरमोड करून ते वसई, नाशिक माहुली वगैरे ठिकाणीं दौऱ्यावर गेले होते. हें त्यांनीं त्यासाठीं काढलेल्या कर्जाच्या कागदपत्रावरून समजून येतें. गंगाधर शास्त्र्यांनीं आपल्या चरित्रांत नारायणरावदादांचा उल्लेख केला आहे. त्यांच्या खुनाचा कट होता असें नारायण रावांस ठाऊक असतें तर ते पंढरपूरच्या यात्रेस निघाले नसते व खुनाचे दुसरे दिवशीं तेथें पोचले नसते. पेशवाई जाऊन आंग्लाई येतांच सर्व सरदारांची इनामी गांवें जप्त झाली व सरंजाम बंद झाला. त्याप्रमाणें नारायणरावदादांचाही बंद झाला. खालसांतील इनाम गांवें सुटलीं पण सरंजाम मिळाला नाहीं. यामुळें त्यांना पैशाची अडचण होऊन फार कष्टांत शेवटचे दिवस काढावे लागले. धर्मादाय पुष्कळ केला. गरीबांस कार्यासाठीं व यात्रेसाठीं मदत केल्याचीं पत्रें आहेत. पुण्यांतील चोळखण आळींतील राममंदीर व वाईंतील सध्याचा वाडा ही त्यांनीं या वेळींच बांधली. पदरच्या सर्व कारकूनांस जमिनी दिल्या. महुरो येथील अमृतेश्वरच्या पुजाऱ्यांस तीन खंडी जमिनीच्या सनदा दिल्या. हीं सर्व कृत्यें पेशवाई संपुष्टांत येण्याचे सुमारास केलीं. त्यावेळीं पैशाची ओढच होती. पण आपला रु ६,००० चा सरंजाम सुटेल या आशेवर ते सत्कृत्यें करीत राहिले. भोसल्याकडील वायगांव व मुंडगांव हीं इनाम गांवें व सरंजाम मिळाला नाहीं. या बाबत बाळाजी महादेव काळे यांनीं लिहलेला एक दफाते आहे. त्यांत हैद्राबादेस केलेल्या प्रयत्नाची हकीगत आहे. तसेच सचिवा कडील ३लाखाचे कर्ज परत मिळालें नाहीं, स्वतःचें कर्ज वाढूं लागलें, म्हणून जिनगी विकून ऋणांतून मुक्त झाले. कर्जदारांना पैसे मिळाल्याच्या पावत्या दफ्तरांत आहेत. जमखिंडोचे रामचंद्र परशुराम पटवर्धन हे यांचे साडू होते. त्यांचे मुलाकडून यांना हलाखीचे स्थितींत पुष्कळ मदत झाली. याना पुत्र नव्हता म्हणून दत्तक घेण्याबद्दल गोपाळराव यांनीं आग्रह केला. पण त्यांनीं दत्तक घेण्याचें नाकारलें. त्यांचा धाकटा भाऊ आनंदराव ( ६ ) आबासाहेब याजला दत्तक मुलगा देऊन वंश चालू राहण्याची तजवीज केली. आपल्या कर्जाचा बोजा धाकट्या भावावर राहूं नये म्हणून मिळकतीची वांटणी केली. भावाची निमी वाटणी ठेऊन, आपली सर्व वाटणी धार्मिक कृत्याकडे लाऊन व त्याप्रमाणें कागद करून तो भावाजवळ दिला, व त्या कागदांत धार्मिक देणगी बंद न करण्याबद्दल शपथ घालून ठेविली. यांच्या औदार्याबद्दल गोपाळराव हरी देशमुखांनीं आपल्या ऐतिहासिक गोष्टी भाग २ या पुस्तकांत नारायणरावदादांच्या औदार्याबद्दल एक गोष्ट १४२ पानावर दिली आहे, त्यांतील उतारा खालील प्रमाणें आहे.

' नारायणराव वैद्य वाईकर हे नागपुरास भोसले सेनासाहेब सुभा यांजकडे पेशव्यांचे वकील होते. त्यांचें दातृत्व इतकें होतें कीं, त्यांनीं तर १७ वेळ आपण व बायको घरांतून बाहेर निघून घरादारासह सर्व दौलतीचें सर्वस्व दान केलें, तरी त्यांचा पुनः संसार जमून ते लाखो रुपयांचे धनी बनले. याकरितां पेशवाईंत हे एक कर्णच होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एके चंद्रग्रहणांत यांचे घरीं भोसले सेनासाहेब सुभा यांजकडून एक लक्ष रुपयांचा भरणा झाला असतां रात्रीं ग्रहणांत त्यांनीं तो सर्व वाटून दिल्या-मुळें कांहीं राहिलें नाहीं; हें समजल्यावर भोसले यांनीं पुनः एक लाख रुपये त्याजकडे पाठवून दिले !'

या आख्यायिकेचें तात्पर्य इतकेंच कीं नारायणराव हे अत्यंत उदार व धर्मशील होते अशी गोपाळ हरींच्या वेळीं लोकांत ख्याती होती.

हे भाद्रपद वद्य १३।१७५० रोजीं संन्यास घेऊन वाईस समाधिस्थ झाले. त्यांची समाधि मधले आळीचे धर्मशाळेजवळील मारुतीचे पारास लागून आहे. यांचे मागून यांचे आईस व बायकोस सातारचे महाराजांकडून रु. ६०० ची तैनात होती. हे रामदासी पंथाचे असावेत. यांची एक लहान कुबडी आहे ती देव्हाऱ्याजवळ ठेवीत व कांहीं संकटसमईं तीस नवस करून खडीसाखर वाटण्याची आमच्या कुटुंबांत चाल असे. यांनीं स्वतः भारत व भागवत लिहिलें होतें ते हस्तलिखित ग्रंथ व इतर पोथ्या वाईच्या प्राज्ञपाठ शाळेस दिल्या आहेत.

हे शके १७२९ सालीं जेष्ठ ते अश्वीन अखेर काशी यात्रेस गेले होते. त्या वेळीं रु. १०३५०॥-। खर्च झाले. ते बाजिरावाबरोबर शके १७३६ सालीं कार्तिकस्वामीचे यात्रेस गेले होते. रु. २६१८८- अश्वीन ते पौषपर्यंत खर्च झाले. शके १७३७ च्या चैत्र-वैशाखांत ते १५।२० दिवस नाशिकास होते. पंढरपूरची यात्रा सन १८१५ व १८१९ सालीं केली. पहिल्या खेपेस रु. ८७० खर्च केले. १८११ सालीं नागपुराहून आल्यावर ते कोंकणांत गेले होते. याबद्दलचे सविस्तर जमाखर्च असून त्यांत त्यांचे मितिवार मुक्काम दिले आहेत.

माधवराव ( ६ ) हा बाबुरावांचा दुसरा मुलगा. यास नाना फडणिसांचे हाता-खालीं बाबुरावांनीं राजकीय शिक्षण देण्यासाठीं ठेविला होता. तो चिटणिसीचें काम करीत असे. बाबुरावांच्या जागीं कांहीं दिवस नागपुरास भोसल्याची वकिली यानें केली होती. याचीं कांहीं पत्रें व नानास लिहिलेल्या चिट्या पारसनीस संग्रहालयांत आहेत. हे सन १७९४ मध्यें वारले.

आनंदराव (६) हे पेशव्याचे सिलेदार होते, त्याबा त्यास तनखाही होता. बाजि-रावाच्या कार्कीर्दीत १७९७ व १८१४ मध्यें नारायणरावास भोसल्याकडे वकिलीचें काम करण्यास पुण्याहून जातां येईना, म्हणून ते तिकडे मातोश्रीस घेऊन गेले होते. घाटगे व शिंदे यांचा नारायणरावांना कैदेंत पुण्यास फार त्रास होत होता. त्या वेळीं आनंदराव नागपुरास होते. नारायणरावांनीं त्या वेळीं आनंदरावांना लिहिलेलें १।३।१७९८ चें पत्र राजवाडे खंड १० मध्यें छापलें आहे. त्यावरून नारायणरावांचें स्वराज्य प्रेम, बंधुप्रेम व मातृप्रेम व्यक्त होतें. नारायणरावांनीं वंश चालू राहण्यासाठीं जमखिंडीचे वैद्य घराण्यांतील एक मुलगा आनंदरावाचे मांडीवर १८२६ सालीं दिला होता, तो १८३६ सालीं वारला. म्हणून आनंदरावांनीं दुसरा कोंकणांतील वैद्यांचा मुलगा दत्तक घेतला,

त्याचेंच नांव माधवराव असें होतें. आनंदराव हे दुसरा मुलगा दत्तक घेतल्यावर लवकरच सकुटुंब काशीस गले. तेथें माघ व. ८।१७७३ रोजीं संन्यास घेऊन समाधिस्थ झाले. यांची बायको उमाबाई ऊ. काकूबाई ही तेथें त्यांचे मागें राहिली होती. तिचा तिकडे आदरातिथ्याबद्दल मोठा लौकिक होता. तिकडून आलेलीं माणसें त्यांना फार नावाजीत असत.

सातव्या पिढींतील माणसांची ऐतिहासिक राजकीय माहिती देण्यासारखी नाहीं. त्यांच्या प्रौढवयांत पेशवाईचा अंत झाला. इंग्रजी अमदानींत देखील सार्वजनिक देश-हिताचीं कामें करणारीं माणसें वैद्य घराण्यांत निपजलेलीं होतीं व आहेत. त्यांत प्रामुख्यानें नांव घेण्यासारखी व्यक्ति म्हणजे रामकृष्ण माधवराव ऊर्फ नानासाहेब हे होत. त्यांना इंग्रजी येत नसून सार्वजनिक कामाची फार हौस असे. त्यांचें चरित्र म्हणजे १९ व्या शतकाच्या दुसऱ्या अर्ध्यांतील वाईक्षेत्राचा सार्वजनिक इतिहासच म्हणतां येईल. महादेव गोविंद रानडे यांनीं दिलेल्या शिकवणीचा धडा यांनीं उत्तम रीतीनें गिरविला होता.

वंशावळींत रघुनाथ भटांचे भाऊ भैरंमभट म्हणून दिले आहेत. यांचे एक चिरंजीव केसो भैरव व नातू धोंडभट यांचीं नांवें देवघेवीच्या व्यवहारांत पुष्कळ वेळां आलीं आहेत. यांचा भोसले दरबारी ही शिरकाव झालेला होता, असें कागदपत्रावरून दिसतें. या घराण्या शिवाय इतर लावगनकर वैद्य राजकारणांत पडल्याबद्दल अजून कागदोपत्रीं माहिती मिळाली नाहीं. सध्यां तांदुळवाडींत असलेल्या लागवनकर वैद्य घराण्याचे पूर्वज साताऱ्यास राजवैद्य होते व त्यांच्यां पैकीं कांहीं पुरुष गुजराथेंत लढाईवर गेले होते. तांदुळवाडीस त्यांचेजवळ जुने कागद आहेत असें ऐकतो. ते पाहण्यास मिळालेवर उपयुक्त माहिती मिळेलसें वाटतें.

आतां माझ्या पूर्वजांच्या ऐतिहासिक राजकीय कामगिरीचें दप्तर मला कसें मिळालें त्याची माहिती देणें जरूर आहे. वंशावळींतील पुरुषांची त्रोटक माहिती दिली आहे त्यावरून आमचें घराणें म्हणजे दोन पुरुषांचा वंशविस्तार आहे. एक बाळंभट व दुसरे विश्वनाथभट. हे दोघे विशेषतः साताऱ्यास महाराजाजवळ राहत असत. पण साताऱ्यास त्यांचें राहण्याचें ठिकाण कोणतें होतें याबद्दल अजून माहिती लागत नाहीं. त्यांस शाहू महाराज हयात असतांनाच वाई येथील सत्यनाथ पुरींत ( मधल्या व गणपती आळींत ) सध्यां वैद्यांचे वाडे ज्या जागेवर आहेत ती जागा राहण्यास मिळाली होती. त्यांना जरी वाईच्या घराच्या जागेची सनद सन १७५० मध्यें मिळाली होती, तरी जमाखर्चाचे कागदावरून ते त्यापूर्वींच वाईस राहत होते असें दिसतें. हे दोघे बंधु शेवटपर्यंत एकत्र होते. सरदारांनी त्यास लिहिलेलीं पत्रें बहुतेक दोघांच्या नांवाचीं आहेत. दोघाचें सगनमत असल्यामुळें त्यांचे पत्रव्यवहाराचे कागद एका ठिकाणीं असणें सहाजिक आहे. त्यांचे जमाखर्च दोघांचीं एकत्र नांवें घालूनच लिहिलेले आहेत. बाळंभट वारल्यानंतर विश्वनाथभट मागे ४ वर्षे होते. तोपर्यंत एकत्रपणा होता. विश्वनाथभट वारल्यावर दोघांच्या मुलांनीं मिळकतीच्या वाटण्या केल्या. यावेळीं बाळंभटांचे चिरंजीव भिकंभट वारलेलेच होते. रामभट व कृष्णराव यांची निम्मी वाटणी व बाबूराव आणि काशीराव यांची निम्मी वाटणी झाली. बाळंभटांच्या मुलांस गणपति आळींतील वाडा मिळाला व विश्वनाथभटांच्या मुलास मधल्या आळींतील वाडा मिळाला. दप्तर

न वाटल्यामुळें बाळंभट व विश्वनाथभट यांचें पानिपत पूर्वीचें सर्व दफ्तर गणपति आळींतील वाड्यांत राहिलें व त्यांत रामभट व कृष्णरावतात्या यांच्या कारकीर्दीतील कागदांची भर पडली. हें सर्व दफ्तर रोजकीर्दी, खतावण्या व पत्रव्यवहार सालवार लाऊन ठेवलेलें होतें. पुढें रामभट वारल्यावर कृष्णराव व रामभटाचे मुलगे भास्करराव यांच्या वांटण्या होऊन खालचा म्हणजे हल्लींचा नानजकरांचा वाडा भास्कररावाकडे गेला व वरचा वाडा कृष्णरावतात्याकडे राहिला. नंतर भास्कररावांचा मुलगा चिंतामणराव यांस पुरुषसंतति नसल्यामुळें त्यांची एकुलती एक मुलगी अन्नपूर्णाबाई सरंजामे इजकडे खालचा वाडा कन्यावारसानें गेला. त्या वाड्यास पुढें सरंजामे यांचा वाडा म्हणत. पुढें सरंजामे यांस कोर्टाचे खर्चामुळें तो वाडा विकावा लागला. व तो त्यांजकडून गणपतराव नानजकर यांनीं विकत घेतला. म्हणून त्यास नाजकरांचा वाडा म्हणतात. वाड्यांतील दफ्तर कृष्णरावतात्याकडेच राहिलें.

बाबूराव काशिरावासह मधल्या आळींतील वाड्यांत निराळे राहूं लागल्यामुळें पानिपत नंतरचें म्हणजे १७६१ नंतरचें त्यांचें दफ्तर तेवढें त्या वाड्यांत होतें. बाबुरावांचे वंशज हल्लीं त्या वाड्यांत राहत आहेत. त्यांचें व त्यांचे चिरंजीव नारायणराव यांचें राजकीय व्यवहाराचें दफ्तर त्या वाड्यांत होतें.

बाळंभटाचे वंशांतील सध्यां अेक पुरुष हयात आहेत. त्यांचे पणतू व्यंकटराव ऊर्फ बापूसाहेब हे सन १८८० सालीं वाईस मरेपर्यंत त्या वाड्यांत त्यांची वस्ती होती. पुढें त्यांचे मुलगे रघुनाथराव जमखिंडीस राहूं लागल्यामुळें त्या वाड्यांतील वैद्यांची वस्ती अजिबात उठली. पण सुदैवानें त्यांचें दफ्तर माडीवरच्या उत्तर बाजूच्या खोलींत ठेवलें गेलें, तसेंच तें तेथें राहिलें. मधून मधून कोणीतरी खोली उघडून कांहीं दफ्तरें चाळलीं व कागद तेथेंच अस्ताव्यस्त टाकले गेले. आंतील जुना पत्रव्यवहार कोणास न कळल्यामुळें रा. साबणे यांनीं घर विकत घेतलें तरी कागद तेथें तसेंच राहिले.

आमचे घरांतील दफ्तरें सुमारें ३०।३५ वर्षांपूर्वी रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं पाहून त्यांतील ऐतिहासिक महत्वाचे कागद निराळे काढले व ते राजवाडे खंड १० मध्यें छापिले आहेत. रा. राजवाडे यांनीं, बाकीच्या कागदांत अजूनही आणखी महत्वाचे कागद सांपडतील, म्हणून ते कागद रुमालांत बांधून जपून ठेवावे अशी सूचना केली होती. मध्यंतरीं रा. आबासाहेब चांदोरकर यांनीं हीं दफ्तरें पाहून त्यांतील सुमारें १००-१२५ कागद भा. इ. सं. मंडळाला दिलेले आहेत. त्याची यादी मंडळांतच आहे. माझा मुक्काम नेहमीं वाईंत नसल्यामुळें, दफतराचें रक्षण, पाऊस, उंदीर, वाळवी व मानवी प्राणी यांचेपासून व्हावें तसें झालें नाहीं, इतकेंच नव्हे तर माझा मुकाम मे महिन्याचे सुटींत सन १९३० चे सुमारास वाईस असतांना एक कागदाचें पोतें चुलीपाशीं जाळण्याकरतां आणलेलें पाहण्यांत आले. त्यावेळीं मी घरांत असल्यामुळें पोत्यांतील कागद सहज पाहूं लागलों तों ऐतिहासिक कागद आहेत असें दिसून आलें. तें पोतें एका बाजूस करून पुण्यास येतांना घेऊन आलों आणि रा. कृष्णाजी पां. कुलकर्णी, रा. य. न. केळकर, रा. कृष्णराव पुरंदरे वगैरे तज्ञांकडून ते कागद तपासून त्यांतील सुमारे ऐतिहासिक १०० पत्रें निवडून काढलीं, तीं बरीचशीं १७७४ ते १७८० च्या दरम्यानचीं आहेत त्यांच्या बऱ्याच नकला

रा. कुलकर्णी यांनीं केल्या आहेत व त्यावर त्यांनीं मंडळांत कांहीं टिपणेंही वाचलीं होतीं. हीं पत्रें छापून त्याला त्यांनीं प्रस्तावना लिहावी असें त्यांचें माझें बोलणें झालें होतें. पुढें मलाही पुनः राहिलेले कागद तपासण्याची बुद्धि झाली. त्यासाठीं मला रियासती वाचणें भाग पडलें. नंतर त्या कागदांतून मी आणखी सुमारें १५० कागद तारखा लाऊन तयार केले व त्यांच्या नकला करून रा. कुलकर्णी यांजपाशीं दिल्या. हे कागद मला लवकर छापतां आले नाहींत. पारसनीस दफतरांतील भोसल्याचे कागद छापण्याचें काम रा० ब० सरदेसाई व सर यदुनाथ हे छापणार होते त्याबरोबर हे छापण्यांत यावे अशी इच्छा होती, पण तें कांहीं जमलें नाहीं. आमच्या दफतरांत ऐतिहासिक पेशवे-कालीन कागदांशिवाय इतर १८१८ नंतरचे कागद पुष्कळ आहेत.

मला हे जुने कागद पाहण्याचा नाद लागल्यामुळें मी भा. इ. सं. मंडळाच्या पाक्षिक सभेला मधून मधून हजर राहत असे. एकदां त्या सभेंत इतिहासभूषण रा. सा. बाबासाहेब देशपांडे यांनीं कांहीं कागद पाक्षिक सभेपुढें पाहण्यासाठीं पाठविले होते, ते कागद पाहतांच आमचे घरचे ते आहेत असें मी ओळखलें. मग तपास करतां कळलें कीं, गणपती आळींतील रा. वैद्यांचें घर त्यांचे जावयांचे बंधु रा. साबणे वकील यांनीं घेतलें आहे तेथें महाबळेश्वराहून येतांना ते उतरले होते, त्यांस वकिलांनीं कागदाची खोली दाखविली. त्यांतील कांहीं कागद त्यांनीं पाहून ते ऐतिहासिक असावेत असें वाटून मंडळाकडे पाठविले. नंतर बाळंभटांचे शाखेंतील हयात पुरुष रा. विनायक व्यंकटेश वैद्य यांनीं गणपतीं आळींतील आपलें घर रा. साबणे वकिलांस विकलें होतें, म्हणून मी त्यांस सांगलीस पत्र लिहिलें कीं, घर विकलें असेल पण कागद विकले नसतीलच, त्या कागदांत आपल्या घराण्याच्या इतिहासास उपयोगी पडतील असे कागद आहेत व कांहीं वतनांचे कागद सांपडतील, तरी ते कागद मला देण्याबा रा. साबणे वकील यांस लिहावें. चि. रा. विनायकराव हे गजानन वीव्हिंग मिल्सचे मालक रा. विष्णुपंत वेलणकर यांचे जावई असून पदवीधर आहेत व सध्यां त्यांस गिरणीचे व्यवस्थापक नेमिले आहेत, ते समजूतदार सुशिक्षित असल्यामुळें त्यांनीं ते कागद मला देण्याबा रा. साबणे यांस लागलींच लिहिलें, आणि रा. साबणे यांनीं ६।७ पोतीं भरून कागदांचीं दफतरें माझें माणसाजवळ दिलीं. माझा समज असा झाला कीं, एवढींच दफतरें वाड्यांत होतीं. पुढें रा. बाबासाहेब देशपांडे यांची गाठ पुनः १।२ वर्षांनीं पडली, तेव्हां वाड्यांत आणखी पुष्कळ कागद आहेत असें त्यांनींच सांगितलें. म्हणून पुनः रा. साबणे वकिलांस लिहून राहिलेले कागद माझे चिरंजीव बाबुराव यांनीं मुद्दाम मोटार लॉरी पाठवून पुण्यास आणून माझ्या हवालीं केले. हे कागद सुमारे १० पोतीं होते.

हे कागद माझ्या उर्वरित आयुष्यांत एकट्यानें पाहून होणें अशक्य होतें; तथापि मी वेळ सांपडेल त्या प्रमाणें एकेक पोतें पाहण्यास सुरुवात केली. या कागदांत हिशोबाचे व जाबसाली पत्रव्यवहाराचे कागद पुष्कळ आहेत, तेव्हां त्यांचें वर्गीकरण करण्याचें योजिलें. रा. कृष्णाजीपंत पुरंदरे यांनीं पत्रव्यवहार एका बाजूस व हिशोबाचे कागद एके बाजूस करण्याचे कामास मोठी मदत केली. हें काम करतांना त्यांनीं सहज लक्षांत येणारीं महत्वाचीं पत्रेंही निराळीं काढून दिलीं. पत्रास तारखा लावण्याचें काम तरी एकट्याच्यानें कसें होणार ? प्रथमतः पत्रें वाचून लेख्य, लेखक व त्यांतील

तारीख एका चिट्टीवर लिहून ती पत्रास टाचण्याचें काम कांहीं थोडें नव्हतें. या कामीं माझे मित्र रा. यशवंतराव फफे यांची मला अमोलिक मदत झाली. त्यांनीं वर लिहिल्याप्रमाणें पत्रास चिटया लाऊन दिल्या व त्या चिट्टीवर पत्रांतील मुद्याचा विषयही थोडक्यांत लिहून ठेविला. चिटया लाविलेलीं पत्रें वाचून पत्रास तारखा लावण्याचें व नकला करण्याचें काम मी करूं लागलों, पण मला हें काम संपविणें कठिणच वाटूं लागलें. पैसे देऊनही नकला करण्यास मनुष्य मिळेना. रा. कृष्णराव पुरंदरे यांनीं २।३ शें कागदाच्या नकला करून दिल्या. नुसतें बालबोध लिहिणारा मिळाला, पण त्यास मोडी वाचण्याची पंचाईत पडूं लागली. मी मोडी वाचून त्यास लिहिण्यास सांगावें तर माझा वेळ त्यांत जाऊं लागला. पत्राच्या तारखा लावणेचें काम मागें पडूं लागलें. मग संदर्भ पाहून पेशव्यांच्या क्रमाप्रमाणें पत्रांचीं पुडकीं तयार केलीं व अगोदर पानिपतच्या पूर्वीच्या पत्रांच्या तारखा लावाव्या असें ठरविलें. दुसऱ्याकडून करून घेतलेल्या नकला मूळ पाहून तपासण्याचें काम करण्यास रा. फफे दररोज तास दीड तास मला मदत करीत व अजूनही करीत आहेत. मोडी अक्षर लावणें व तारखा लावणें या कामीं मला रा. फफे यांची मदत मिळाली नसती तर मी योजलेलें काम सोडून द्यावें लागलें असतें. पत्राच्या नकला नुसत्या छापण्यांत अर्थ नसल्यामुळें, पत्रांतील संदर्भ समजण्यासाठीं कित्येक शब्दांचे अर्थ कोशांत पाहून ते टिपून ठेवले व ते अर्थ पत्राच्या खालीं देण्याचें ठरविलें आहे. कांहीं जमा खर्चाच्या बेरजा जमेनात. त्यावरही विचार करून त्याचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. रा फफे यांनीं सूचीच्या चिटयाही करण्यास मदत केली,

पुष्कळ पत्रें अस्सल असल्यामुळें त्यावर शिक्के व मोर्तब आहेत. शिक्के वाचण्या–चीही बरीच अडचण भासली; पण आम्हीं दोघांनीं ते वाचून लिहिले आहेत. ( रा. वासुदेवराव बेंद्रे यांनीं बराच अभ्यास करून शिक्याबद्दल टिपणेंही केली आहेत. त्यांनीं शिक्याबद्दल काय काय टिपणें करण्याची जरूरी आहे याचा एक छापील कागद तयार केला आहे. त्याप्रमाणें आम्हास टिपणें करण्यास वेळ झाला नाही. )

पैसे देऊनच कां होईना पण मोडी वाचतां येऊन सुबोध नकला करणारा मनुष्य मला मिळाला आहे. यांचें नांव रा. गोपाळराव खांडेकर. ह्यांचें वय ८० वर्षांहून जास्त असून ते पूर्वीं सातारचे महाराजाकडे नोकर होते. यामुळें त्यांना जुने कागद वाचण्याचा सराव आहे. खांडेकर हें सातारचे फडणीस घराणें असून, फार पुरातनचें ऐतिहासिक आहे. असा मनुष्य मला मिळणें हा एक योगायोगच आहे.

सध्यां पानिपत पूर्वींच्या कागदाच्या नकला करून तारीखवार लावलेले कागद मजजवळ सुमारें २००० तरी तयार आहेत. पानिपत पूर्वींचे तारखा लावण्याचे कागद सुमारें ५०० तरी चिठया लावून पडले आहेत. हिशोबाचीं पुडकीं हातीं घेण्यास मला पत्रें लावण्यापुढें वेळच होत नाहीं. पहिले बाजीरावअखेरपर्यंतचे कागद माझे दफ्तरांत फार निघाले नाहींत. त्यावेळचे माझे पूर्वज भास्करभट वैद्य यांच्या हयातीतले जमाखर्च पुष्कळ आहेत. पण पत्रव्यवहाचे कागद फार सांपडत नाहींत. जमाखर्चाच्या पुडक्यांत कांहीं कागद अजून सांपडतील. ते पाहण्यास अलीकडे मी सुरवात केली होती, पण हिशेबाचे सर्व कागद तपासल्यानंतर छाप-ण्याचें काम सुरू करावें तर त्यास किती दिवस लागतील याचा नेम नाहीं. म्हणून वयो-मानाकडे लक्ष देऊन तूर्त बाजीरावाच्या मृत्यूपूर्वींचे तयार कागद प्रसिद्ध करण्याचें ठरविलें व त्याचा हा पहिला खंड छापिला आहे.

मजजवळ कागदाचें दफ्तर आहे हें मी मंडळांत पुष्कळ वर्षें सांगत आलों आहे व त्यांतील कांहीं निवडक पत्रें मंडळाच्या पाक्षिक सभेंत व संमेलनांत वाचलीं आहेत. रा० ब० सरदेसाई यांच्यासारख्या मुरब्बी माणसानें दोन वर्षांपूर्वी पुण्यास आले असतां माझे दफ्तरांतील नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीतील कांहीं कागद पाहिले होते, पण त्यांच्या व्यापामुळें त्यास प्रत्यक्ष दफ्तर किती आहे हें पाहण्याचा योग आला नाहीं. मजजवळ त्रिचनापल्लीच्या चंदासाहेबाच्या बंदिवासाबद्दलचीं पत्रें मागाहून सांपडलीं, तीं मी कामशेतास जाऊन त्यास दाखविलीं. त्यांनीं तीं वाचून त्यांच्या नकला घेतल्या व त्यावर मॉडर्न रिव्हूच्या डिसेंबर १९४३ च्या अंकांत 'Chandasaheb in Confinement' असा एक निबंध छापून प्रसिद्ध केला. तो वाचून मला बऱ्याच जणांचीं पत्रें आलीं आहेत. वैद्य दफ्तर हें काय आहे हें समजण्याबद्दल इतिहासज्ञांची जिज्ञासा वाढत जाऊं नये म्हणून एक स्फुट मंडळाच्या एका अंकांत प्रसिद्ध केलें आहे. पुढें माझ्या दफतराची व त्याच्या प्रसिद्धीकरतां केलेल्या तयारीची रा. ब. सरदेसाई यास कल्पना यावी म्हणून माझे मदतनीस रा. यशवंतराव फफे यास घेऊन मी कामशेत येथें कागदाचीं ५।६ पुडकीं घेऊन गेलों. हे कागद सुमारे दीड हजार असावे. ते कागद त्यांनीं वाचण्याचें कबूल केलें. त्यांनीं नानासाो पेशव्यांचा सुधारलेला रिसायतीचा खंड छापण्यासाठीं दिलेला होता व त्यांनीं थोरले माधवरावांचा सुधारलेला भाग लिहिण्यास सुरवात केली होती, यामुळें त्यांना माझे कागद वाचण्यानें कांहीं जास्त माहिती मिळण्याचा संभव होता. मी आपलीं कागदाचीं पुडकीं त्यांजपाशीं ठेविलीं व ते म्हणाले, 'हीं पुडकीं वाचून मी स्वतः घेऊन येतों.' त्याप्रमाणें ६ दिवस पत्रें वाचण्याचें काम एकसारखें करून माझीं पुडकीं मला देण्यासाठीं ते पुण्यास आले व त्यासंबंधीं त्यांनीं आपलें मत लिहून काढलें होतें, त्यासह पुडकीं माझे हवालीं केलीं. त्यांचें मत या खंडाचे आरंभीं मराठी अनुवादासह छापिलें आहे. म. रि. बाजीराव भाग १ मध्यें माझ्या दफ्तरांतील पत्रांचा उल्लेख केला आहे.

रा. ब. सरदेसाई यांनीं गेल्या डिसेंबरमध्यें माझे कागद पाहिले होते. त्यानंतर गेल्या ४।५ महिन्यांत मी त्या पुडक्यांत सुमारे १००।२०० कागद नकलून तारखा लाऊन मिसळले असतील. त्या कागदांतही पुष्कळ महत्वाचे कागद आले आहेत. तारखा न लावलेले व लावलेले व त्यांस चिटचा जोडलेले सुमारे ५००।६०० कागद मजपाशीं आहेत. पण ते अजून त्यांनीं पाहिले नाहींत. शिवाय पुष्कळ कागदास अजून लेख व लेखक यांच्या चिटचा जोडून त्यास तारखा लाऊन त्यांच्या नकला होणें आहेत, ते कागद त्यांचे नजरेखालून गेले नाहींत. यामुळें माझ्या जवळील कागदांची त्यांस पूर्ण कल्पना आली आहे असें म्हणतां येत नाहीं. रोजच्या रोज जमेल त्याप्रमाणें कागद निवडून तारखा लाऊन, व नकलून ते छापण्यास तयार करण्याचें माझें काम रा. फफे यांच्या मदतीनें चालू आहे. आतां त्यांनीं लिहून दिलेल्या अहवालांत स्वतःचें मत व कांहीं सूचना दिल्या आहेत, त्याबद्दल दोन शब्द लिहिणें जरूर आहे.

( १ ) माझे दफतरांतील कागद फक्त अर्ध्या शतकांतील माहिती देणारे आहेत असें नाहीं. बाजिरावापासून पेशवाई अखेर १ शतकाचा काल होतो. त्यानंतरही माझे पूर्वजांचे पत्रव्यवहाराचे व हिशोबाचे कागद कै. रामकृष्ण माधवराव ऊर्फ नानासाहेब मरेपर्यंतचे म्हणजे १९२४ पर्यंतचे आहेत. १८१८ नंतरच्या कागदांस ऐतिहासिक महत्व

फारसें नाहीं. रा. ब. सरदेसाई यांनीं मजजवळील ऐतिहासिक कागदांच्या कालाचा जो कयास केला आहे त्याचे दुप्पट कालांतील कागद मजपाशीं आहेत येवढेंच नमूद करावयाचें आहे.

( २ ) रावबहादुरांनीं माझ्या कामाबद्दल मला जास्त मोठेपणा दिला आहे. त्यांनीं पाहिलेल्या कागदांत त्यांना तारखेची एकही चूक आढळून आली नाहीं, हें खरें असेल; पण तारखा बिनचूक लावल्या आहेत अशी हमी माझ्या अनुभवावरून मला देतां येत नाहीं. लावलेल्या तारखांतही चुका निघतील असें वाटतें. पेशवे दफतरांतील कागदांच्या लावलेल्या तारखा अजूनही दुरुस्त कराव्या लागत आहेत. तेव्हां माझ्या तारखा बिनचुक आहेत असें मी म्हणण्यास तयार नाहीं. तारखा बिनचुक लावण्याचें काम फार श्रमाचे व कठिण आहे, इतकेंच मी म्हणूं शकेन.

( ३ ) रावबहादुरांचें म्हणणें वैद्य हे मुख्यतः सावकार होते. ते सावकार नव्हते असें मीही म्हणूं शकत नाहीं; पण मराठेशाहींत सावकार लोकांस 'नाईक' हा किताब त्यांचे नांवापुढें लावीत. उदाहरणार्थ; रास्ते, दामले, अनगळ, जोशी, भिडे, केळकर, वाकडे, गद्रे, हे सर्व सावकारी धंदा मुख्यत्वें करीत असल्यामुळें त्यास 'नाईक' म्हणत. ते राजदरबारीं सल्लागार नव्हते असें नाहीं; पण तो त्यांचा धंदा दुय्यम प्रतीचा होता. म्हणून त्यांचा नाईक हा मुख्य किताब सुटला नाहीं. वैद्यांचा राजदरबारीं वकील व सल्लागार हा मुख्य पेशा असल्यामुळें त्यांना कधींच नाईक म्हटल्याचें आढळून येत नाहीं. त्यांनीं लाखो रुपयांच्या उलाढाली केल्या आहेत. त्यांनीं मोठीं कर्जे दिल्याचे कर्जरोखेही आहेत. प्रत्यक्ष पेशवे व भोसले यास हजारो रुपये वेळोवेळीं दिल्याचे कागद पुष्कळ सांपडत आहेत. तेव्हां देवघेवीचा धंदा ते करीत नव्हते असें म्हणतांच येणार नाहीं. पण मला वाटतें वैद्यांनीं मुख्य वकीलीचा व सल्लागाराचाच जास्त धंदा केला असें कागदपत्रावरून म्हणतां येईल. पैशामुळें त्यांना राजदरबारीं मान होता हें रावबहादुरांचें म्हणणें खोटें नाहीं. वैद्यांना शाहूमहाराजांनीं धार्मिक कृत्यें करण्यास सांगून 'आचार्य' असेंही संबोधलें आहे.

( ४ ) शाहूच्या मरणानंतर मराठी दरबारचें मुख्य स्थान पुणें शहर झाल्यामुळें वैद्यांचें वजन नानासाहेबांच्या दरबारी कमी झालें असें म्हणतां येणार नाहीं. वैद्यांची सातान्यापेक्षां पुण्यास राहण्यासंबंधानें गैरसोय झाली असेल; पण त्यामुळें वैद्य पुणें दरबारीं मागें पडले, असें अनुमान काढतां येणार नाहीं. भोसले दरबारीं पेशव्यांचे वकील म्हणून वैद्य हेच सूत्रें हलवीत असत. हें कागदपत्रावरून रावबहादुरांच्या लक्षांत आलेंच आहे. वैद्यांनीं पुण्यास नानासाहेबांच्या कारकीर्दीत राहण्याचें ठिकाण कोठें केलें होतें हें अजून मला समजूं शकलें नाहीं. त्याचा सचीव, प्रतिनिधि, पटवर्धन व अंग्रे यांजपाशींही निकट संबंध होता. तेव्हां त्यांनीं पुण्यास कोठेंतरी राहण्याची सोय केली असली पाहिजे.

( ५ ) पत्रांवरील शिक्क्यासंबंधानें रावबहादुरांनीं माझे दफतरांतील शिक्के पाहून केलेलें अनुमान खरें आहे. त्याबद्दलचा अभ्यास फार कठिण आहे. मला तो अभ्यास कागद लावण्याच्या कामापुढें करतां आला नाहीं व करतां येईल असें वाटत नाहीं. एकच माणसाचें एकाहून अधिक शिक्के असतात व ते तो निरनिराळ्या प्रसंगानें वापरतो असें शिक्क्यांचा अभ्यास करणारे रा. व्ही. एस्. बेन्द्रे

यांजपाशीं केलेल्या वाटाघाटीवरून मला समजून आलें. तेव्हां शिक्यांचा अभ्यास करणें तूर्त माझ्या अवाक्याबाहेर आहे. पत्रें छापतांना त्यावरील शिक्के जशाच्या तसे आकारानें छापतां आले नाहीत तरी त्यांतील मजकूर व आकाराचें वर्णन देण्याचा प्रयत्न केला आहे. कांहीं शिक्के स्पष्ट उठलेले नाहींत, यामुळें ते चांगले वाचतां येण्यास पंचाईत पडते. रा. जोशी व चांदोरकर यांनीं 'श्री शिवशाहीचा लेखनालंकार' या पुस्तकांत दिलेली माहिती फार उपयुक्त आहे. पण त्यांत बरेच लोकांचे शिक्के आढळून येत नाहींत. व जे दिले आहेत त्यापेक्षां निराळे शिक्केही आढळून येतात.

( ६ ) रावबहादुरांनीं कांहीं महत्वाचीं पत्रें काढून तीं निराळीं छापण्याबद्दल उपयुक्त सूचना केली आहे. याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पण त्याप्रमाणें करणें मला सध्याच्या परिस्थितींत शक्य दिसत नाहीं. कागदाची व छापण्याची अडचण लक्षांत घ्यावी लागत आहे. शिवाय माझ्या शारीरिक व मानसिक सामर्थ्याचाही विचार करणें भाग आहे. निराळें पुस्तक म्हटलें म्हणजे शारीरिक व मानसिक श्रमाचा व्यय होणारच. कै. दत्तोपंत आपटे यांनीं माझे कागदाची नानासाहेबांच्या कार्कीर्दीतील १।२ पुडकीं पाहिलीं होतीं व तूर्त तारीखवार कागद लावण्याचा जो मी क्रम सुरू केला आहे तोच त्यास पसंत पडून 'त्याप्रोंच कागद छापून काढा' असें त्यांचें सांगणें होतें. हा त्यांचा सल्ला मला कमी खर्चाचा व श्रमाचा वाटला, म्हणून मला रावबहादुरांच्या सुचनेचा अंमिकार करतां आला नाहीं त्यांनी निराळे काढलेले कागद मी तारीखवार पूर्वीप्रों लाऊन छापण्याचें ठरविलें आहे. वाचकांनी किंवा अभ्यासूंनीं त्यांची निवड करण्यास हरकत नाही.

( ७ ) वैद्य दफतरांतील ९० टक्के कागद पैशाच्या व्यवहाराचे असले, तरी त्यांचें काय महत्व आहे हें रावबहादुरांनीं आपल्या लेखांत दाखवून दिलें आहे कांहीं हिशोबाचे कागद वैद्यांचें राजकीय महत्व दाखविणारे आहेत, यामुळें ते मी छापण्याचे कागदांत घालीत आहे. कांहीं हिशोबाच्या कागदांत वैद्यांचे प्रवासांतील मुक्काम दिले आहेत. त्याचेंही महत्व आहे. तेव्हां ९० टक्यांपैकीं बरेच कागद मी उपयोगांत आणीन असें वाटतें. त्या कागदांवरून वैद्यांचे पैशाचे व्यवहार कोणकोणत्या पैसेकरी व अधिकारी माणसांशीं होते हें समजेल, व वैद्यांचें राजकीय व सामाजिक महत्वही कळून येईल. सर्व हिशोब मी छापण्याचे भानगडींत पडत नाहीं. कारण ते फार आहेत व ते पाहून छापणें श्रमाचें व खर्चाचें काम आहे. रा नानासाहेब चाफेकर त्यांतून पुष्कळ गोष्टी काढूं शकतील.

कोणाही विश्वविद्यालयीन अभ्यासकास मला अस्सल पत्रव्यवहार व हिशोब दाखविण्यास हरकत नाहीं. पूर्वीचे पैशाचे व्यवहार पाहून चकितच होण्याची वेळ येते. त्रिचनापल्लीच्या चंदासाहेबास सोडविण्यासाठीं ७॥ लाखांची तजवीच कशी केली यासंबंधाचे हिशोब व पत्रव्यवहार पाहून त्यांशीं संबंध असणाऱ्या माणसांचें व्यवहारचातुर्य दिसून येतें. हुंडधांचे व्यवहारही बिनधोक कसे चालत हें कागदपत्रांवरून समजण्याजोगें आहे. जुन्या कागदांचा रावबहादुरांच्या म्हणण्याप्रों उपयोग करून घेण्यास मोडी वाचण्यास शिकविणाऱ्या संस्था स्थापन करण्याची प्रथमतः तजवीज करणें जरूर आहे, असें मला वाटतें.

( ८ ) विश्वनाथभटांच्या काशोयात्रेचे कागद पुष्कळच आहेत व आणखी सापडत आहेत. ते जनार्दन पंताची स्त्री सगुणाबाई इच्याबरोबर गेले नव्हते. मात्र ती काशीस

असतांना ते वाईकडील हजार दीडहजार माणसें यात्रेंकरतां बरोबर घेऊन व योग्य ती तजवीज करून गेले होते याबद्दल देवराव लपाटे यांचें पत्र पेशवे दफ्तरांत आहे. यांस तिकडील मुसलमान राजांनीं पकडून अटकेंत ठेविले होते. त्यांतून सुटण्यासाठीं त्यांना ६१,००० रु. खर्चावें लागले. तेव्हां यात्रेला किती खर्च आला असेल याची कल्पना करावी. यावेळीं अबदालीची गडबड तिकडे चालू होती.

सन १८५२ सालीं इंग्रज सरकारानें मि. हरण ( Horn ) साहेबाकडून सरदारांच्या घरचीं दफ्तरें नेल्याबद्दल व्यंकटराव बापू वैद्य ( ८ ) यास त्यांची मातुश्री गंगाबाई इनें जमखिंडीस ८।१२।१८५२ रोजी पत्र लिहिलें होतें, त्यांत ती लिहितेः— मे. हरण साहेब बहादुर असिस्टंट इनाम कमेटी कडील, वाईस येऊन गावांतील थोरथोर लोकांचे घरचे झाडे घेऊन कागद सर्व नेले व आमचे घरचेंही सर्व कागद नेले. येकशे सत्तावीश रुमाल येकंदर निघाले. त्यांपेकीं ७ रुमाल अलीकडील सिलकबंदाचे मात्र परत दिले. बाकी सर्व कागद, येकशेवीस रुमाल घेऊन गेले व इनाम पत्राचा रुमाल मात्र राहिला. तो ईश्वरानेंच संरक्षण केलें. तो चमत्कार पत्रीं लिहितां येत नाहीं. ' ही हकीकत गणपती आळींतील वाड्यांमधील दफतराची आहे. मधलेआळीतील वाड्यांतूनही दफतरें नेण्यांत आलीं होतीं. त्याबद्दलचें पत्र जरी आतां मला सांपडलें नाही तरी नेलेलीं दफतरें परत घेण्यासाठीं सन १७५४ सालीं व्यंकटराव बापूनीं जसें नारो भास्कर जोगळेकर यांस जमखिडीहून मुखत्यारपत्र पाठविलें होतें, तसेंच माधवराव आनंद ( ७ ) यांनीं ही हरी गोविंद कोलटकर यास मुखत्यारपत्र पाठविलें होतें. दोन्हीं मुखत्यार पत्रें दफतरांत आहेत. दोघेही जमखिडी संस्थानांत नोकर होते. मुखत्यारनाम्यांवर संस्थानच्या मामलेदारानें सही केलेली आहे. कांहीं दफतरें परत मिळालीं असावीं. इनामकमेटीच्या दफतर-खान्यांतील बाकीचीं दफ्तरें परत मिळविण्याचा प्रयत्न केला पण उपयोग झाला नाहीं. त्या कागदांतही उपयुक्त कागद असतील.

वैद्य दफ्तराबद्दल जी माहिती वर दिली आहे. ती केवळ आमच्या घरीं असलेल्या कागदापुरती आहे. येवढ्यानें वैद्यांचे कागद संपले असें होत नाहीं. आमच्या दफ्तरांत वस्तुतः आम्हांस दुसऱ्यांकडून आलेलीं पत्रें सांपडायाचीं, व आम्हीं ज्यांस पत्रें लिहिलीं तीं त्यांच्या दफ्तरांत असावयाचीं. नाना फडणिसांनीं लिहिलेलीं पत्रें त्यांचें दफ्तरांत नाहींत. तीं पेशवे दफ्तरांत किंवा इतर सरदारांचें दफ्तरांत सांपडतात. नाना फडणीस, सखारामबापू बोकील, भास्करराम कोल्हटकर, सरदार पटवर्धन, शाहू महाराज, भोसले व अंग्रे वगैरेंचीं स्वदस्तुरचीं पत्रें व सही शिक्याचीं पत्रें आमच्या दफ्तरांत भरपूर आहेत. आमचीं पत्रें ज्या सरदारांचे नातेवाईकांस व सावकारास जात त्या घराण्यांचीं नांवें खालीं देत आहे:—

अभ्यंकर, आगाशे, आठवले, आपटे, ओक ( ओंकार ), आंबेडकर, कमलाकर, करकरे, करंदीकर, करमरकर, कल्याण, काकडे, काणे, काथवटे, कानडे, कानिटकर, कान्हेरे, कारखानीस, कारंजकर, काळे, किरपंत, कुंटे, केतकर, केळकर, कोपरकर, कोलटकर, खरे, खाडिलकर, खासनिवीस, गणपुले, गद्रे, गाडगीळ, गुडिबे, गोकाक, गोगटे, गोखले, गोर्डखिंडीकर, गोडबोले,

गोडसे, गोरे, गोसावी, गोळे, घांगरेकर, घाणेकर, घारे, घोरपडे, चव्हाण, चाफेकर, चिटणीस, चितळे, चिपळूणकर, छत्रे, जोग, जोगदेव, जोगळेकर, जोशी, टकले, डिंगणकर, ढापरे, ठोंबरे, तब्रीब, तेलंग, तेरेदेसाई, थत्ते, थोरात, दरवे, दातार, दांडेकर, दाबके, दाभोळकर, दामले, देऊसकर, देशपांडे, देशमुख, देव, देवधर, देसाई, नातू, नित्सुरे, नेने, पटवर्धन, पंडित, परांजपे, पाटणकर, पानसे, पारकर, पुरंदरे, पुरोहित, पुसाळकर, पेंडसे, पेठे, पोतनीस, पोंक्षे, फगरे, फडके, फाटक, फलणीकर, बागूल, बापट, बापये, बाम, बाळ, बिवलकर, बेडेकर, बेहरे, बोडस, भट, भाकरे, भागवत, भानू, भांबले, भावे, भिडे, भिलारे, भुस्कुटे, भोसले, भोगले, माटे, मांजगांवकर, माणकेश्वर, मालशे, मेंगदे, मेढेकर, मोने, मोरे, येरंडे, राजवाडे, रानडे, रास्ते, रिसबूड, रोटीथोर, लवाटे, लागू, लिमये, लोहकरे, वझे, वर्तक, वाटवे, वाडदेकर, वेलणकर, शारंगपाणी, शिंदे, सगरे, सहस्रबुद्धे, साठे, साने, सावरकर, सिवलीकर, सेलार, सेवते, सोवनी, हर्षे.

पारसनीस संग्रहालयांत नारायणराव व बाबूराव यांचीं सुमारें २००।२५० पत्रें आहेत.

आतां पर्यंत प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक कागदांचा मोठा भरणा पेशवे दफतर खंड ४५ मध्यें आहे. त्यांचे पानांची संख्या ७८०० आहे. राजवाडे खंड २४ यांत ही पुष्कळ पत्रें निरनिराळ्या घरचीं जमविलेलीं आहेत. पंत अमात्य दफतर २०१ पत्रें, बडोदें दफतर ८९८ पत्रें, चंद्रचूड दफ्तर ४०३ पत्रें, पुरंदरे दफतर ११६९ पत्रें, होळकर दफतर ३३७ पत्रें, पटवर्धन दफतर ( खरे ) ६८४३ पत्रें, महेश्वर दफतर ४०१ पत्रें, अशीं एकेका घराण्याचीं पत्रें छापून प्रसिद्ध झालीं आहेत. यापैकीं ज्यास सूची आहे, त्यांचा संशोधकांस सहज उपयोग होतो. बिन सूचीच्या पुस्तकाचा उपयोग करणें फार कठीण जातें. वेळ घालवूनही कांहीं माहिती मिळत नाहीं. आणखी किरकोळ ऐतिहासिक टिपणेंही प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्याचा नामनिर्देश करीत नाहीं. पत्रें थोडीं असलीं तरी तीं संशोधकांस उपयोगीं पडणारीं आहेत. अशा प्रकारचें ऐतिहासिक साहित्य पुढें असतांना माझ्या दफतराचें महत्व काय ? याचें दिग्दर्शन करणें जरूर आहे.

( १ ) शिवकालापासून पेशवाई बुडे पर्यंत मराठी राज्याच्या राजकारणांत खंड न पडतां भाग घेणारीं फार थोडीं घराणीं आहेत. त्यांत वैद्य घराण्याचा समावेश होतो. हें लक्षांत घेतलें पाहिजे; इतकेंच नव्हे तर वैद्यांनीं स्वराज्यासाठीं झटणाऱ्या अष्टप्रधानांस व इतर सरदारांस केवळ सल्लाच दिला आहे असें नसून स्वतःचा पैसाही त्यांस वेळीं अवेळीं देण्यास कमी केलें नाहीं.

( २ ) वैद्य घराण्याचा ज्या सरदार घराण्याशीं संबंध आला त्यांचीं इतकीं पत्रें आहेत कीं, त्यांत त्या घराण्यांतील बायका पुरुषांचीं नांवें, जन्मकाल, कार्यें व विशेष कामगीऱ्या यांचें वर्णन सांपडते. कुलवृत्तांतास या माहितीचा उपयोग फार होईल.

( ३ ) माझ्या पूर्वजांना बंगालपर्यंत जाण्याचा प्रसंग आला, तेव्हां अर्थात् त्यांच्या पत्रांतून राजकारणांच्या व लढायांच्या हकीगतीचा समावेश झाला आहे. त्यांमध्यें स्वतःचे

व इतरांचे मुक्काम दिले आहेत. त्यास आलेलीं पत्रें पंत सचीव अमात्य, सोमवंशीं, अंग्रे, पटवर्धन, भोसले वगैरे सारख्या सरदारांचीं ही शिक्याचीं आहेत. त्यांत पुष्कळ महत्वाच्या गोष्टी आलेल्या आहेत. हें पुढें जे पत्रांचे खंड छापले जातील, त्यावरून लक्षांत येईल. खड्यांच्या लढाईचीं सुमारें ३० पत्रें इत्थंभूत व विश्वसनीय हकीकत देणारीं आहेत, परशुराम भाऊचा जावई रघुनाथराव वैद्य लढाईवर गेला असतां त्यानें आपल्या बापास लिहिलेल्या पत्रांत ही हकीकत आहे. सोमवंशी सरलष्कर यांचीं पुष्कळ महत्वाचीं पत्रें दफतरांत आहेत; पण त्यांच्या वंशावळीच्या अभावी त्यांचा काल ठरविणें कठीण झालें आहे.

( ४ ) माझ्या दफतरांत २०० वर्षांच्या अवधींत राजवैद्यांनीं निरनिराळ्या रोगांवर दिलेल्या औषधांच्या याद्या सांपडल्या आहेत. हत्ती व उंट यांस अजार आला असतां, त्यावर औषधी अुपाय सुचविलें आहेत. ह्या सर्व याद्या एकत्र करून त्यांस टिपा देऊन छापण्याचें काम माझे मेहुणे इस्लामपूरचे चि. रा. भाऊराव वैद्य डाक्तर यांनीं पतकरलें आहे, व त्याप्रमाणें त्यांचीं टिपणेंही तयार आहेत. त्याचा एक निराळा खंड काढावा लागेल.

( ५ ) माझ्या दफतरांत निरनिराळ्या घराण्याचे कागद सांपडले आहेत व सांपडत आहेत. त्यांचीं पुडकीं करून ठेविलीं आहेत. घराण्याचे इतिहास लिहिण्यास त्यांचा उपयोग होत आहे व होईल. अलीकडे जें घराण्यांचे इतिहास प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत मी दिलेल्या कागदांचा उल्लेख झाला आहे. पुढें कुलवृत्तांत निघतील किंवा सुधारले जातील, त्यास मजजवळील कागद मिळूं शकतील.

( ६ ) माझ्या कागदांत एक विशेष गोष्ट नजरेस येते ती अशी कीं, वैद्यांच्या पदरीं सर्व जातीचें लोक होते. वैद्य कोकणस्थ म्हणून त्यांचे कारकून कोकणस्थच होते असें नाहीं. देशस्थ व कऱ्हाडे ब्राम्हणही त्यांचे कारकून होते. मुसलमान व मराठे तर नोकर होतेच. काम करील तो नोकर, त्यांत जातिभेद नाहीं.

७ यांनीं पुष्कळ लहानमोठ्या लोकांना उसनवार पैसे दिले होते. व्याजही कागदांत दरमहा दर शेंकडा १ रु. लावलेलें अढळून येतें. पैशाचे वसुलीबद्दल तगादेही पुष्कळ करण्याचा प्रसंग येत असे. पण ऋणकोची सोय नसल्यास त्यास सवलत व सूट देण्याकडेही प्रवृत्ति दिसून येते.

(८) बायकांनीं बायकांस व पुरुषास लिहिलेलीं पत्रें पुष्कळ आहेत. बाळंभटा(४)ची बायको सरस्वतीबाई इनें यजमान वारल्यावर देवघेवीचा व्यवहार पुष्कळ केला होता. त्याचे कागदपत्र पुष्कळ आहेत. तसेंच कृष्णरावतात्या (५) च्या मुलींची पत्रें वडिलास, बहिणीस व मातुश्रीस आलेली पुष्कळ आहेत. त्यांत बराच घरगुती मजकूर आहे. तथापि त्या पत्रांचा एकमेकांचीं नातीं ठरविण्यास उपयोग होतो. या पत्रांतून एकमेकांचे घरच्या लग्नमुंजी, गर्भदानें, बाळंतविडा वगैरेचा मजकूर वाचावयास मिळतो. रास्ते घराण्यांत वैद्यांच्या तीन मुलीं दिल्या होत्या त्यांचा पत्रव्यवहार फार आहे. राघोपंत थत्ते यांच्या ४ मुली होत्या. त्यांपैकीं एक व्यंकटराव बापू (८) वैद्य यास दिलीं होती. बाकीच्या

मुली खाजगीवाले, किल्ल्यांतील पटवर्धन व चिपळूणकर सावकार यांजकडे दिल्या होत्या. बहिणींचीं एकमेकीस पत्रें जात असत. थत्ते यांचें घर वाईस होतें. ते वारले, तेव्हां त्यांची बायको आनंदीबाई वाईस होती. तिनें आपले कागदपत्र आपल्या जावयाकडे [व्यंकटराव] आणून ठेविले होते यामुळें थत्यांचीं २।३ दफतरें आमच्या कागदपत्रांत आहेत. सचीव यांजपाशीं झालेल्या देवघेवीबद्दलचे कागदपत्र पुष्कळच आहेत. २।३ रुमाल चिमणाजी नारायणाच्या कारकीर्दीपासून झालेल्या पत्रव्यवहाराचे आहेत. त्यांत वैद्यांप्रमाणें इतर सावकारांनीं सचीबांस दिलेल्या पैशाबद्दलही पत्रव्यवहार आहे. मुख्य कारकुनास पूर्वी दिवाणजी म्हणण्याची चाल असे. रामचंद्रपंत करकरे, देऊसकर, जोगळेकर, अठवले, वगैरे कारकुनांची फार पत्रें आहेत. लग्नकार्यांचे तपशीलवार ताळेबंद आहेत. त्यांत कोणांस निमंत्रणें पाठविलीं कोणकोणाकडून अहेर आले, कोणकोणास काय देहेनग्या दिल्या, याज्ञिकी व धर्मादाय खर्च काय केला याची सविस्तर माहिती मिळते. परशुरामभाऊ पटवर्धनांची मुलगी रघुनाथराव ( ६ ) वैद्य यास दिली होती, तिची मुलगी यमूबाई बारामतीकर जोशीकडे दिली होती. तिनें आईस, वडिलास, आजोबास व अत्याबाईस लिहिलेलीं पत्रें पुष्कळ आहेत. कृष्णरावतात्यांचा कुडाळखोऱ्यांत व इनामगांवीं किरकोळ देवघेवीचा व्यवहार फार होता. त्याचे कागद व चिट्याचपाट्या फार आहेत. कोलटकर घराण्याचे कागद पुष्कळच आहेत. विश्वासराव ( ७ ) बाबाची बायको ही पांडेवाडीचे कोलटकरांकडील होती. तिची आई यशोदाबाई इचा संस्थानिक पटवर्धन, रास्ते व रामदुर्गकर भावे या घराण्याशी नात्याचा संबंध असल्यामुळें त्यांच्याशीं झालेला पत्रव्यवहार फार आहे. नारायणराव ( ६ ) वैद्याकडे कोलटकर घराण्यांतील पुरुष ४ पिढ्या कारकून होते. त्यांचे कागद दफतरांत पुष्कळ आहेत.

( ९ ) आमचेघराण्यांतील पुरुषांचीं लिहिलेलीं पत्रें आमचें दफतरांत पुष्कळ सांपडतात, याचें कारण यजमान वाई सोडून सातारा, पुणें, नागपूर वगैरे ठिकाणीं गेले म्हणजे त्यांनीं आपले भावास, वडिलास किंवा कारकुनास पत्रें लिहिलीं आहेत तीं सांपडतात. विश्वनाथभट, बाबुराव किंवा नारायणराव यांनीं नागपुरास लक्ष्मण बल्लाळ जोशी, रामचंद्रपंत करकरे किंवा देऊसकर यांस लिहिलेलीं पत्रें व कारकुनांनीं नागपुरास पाठविलेलीं पत्रें नागपूरचे वाड्यांत होतीं. तेथील दफतर वाईस पाठविण्याची खबरदारी तिकडील व्यवस्थापक रा. घारपुरे, साने वगैरेंनीं घेतली. यामुळें तिकडील पत्रव्यवहार, सरंजामी व इनामगांवचे हिशोब, रोजकीर्दी व खतावण्या आमच्या दफतरांत पहावयास मिळत आहेत.

( १० ) बाळंभट, विश्वनाथभट, रामभट व बाबूराव यांच्या बऱ्याच रोजकीर्दी व खतावण्या सुटे कागदावर लिहिलेल्या आहेत. पानिपतनंतरचे जमाखर्चाच्या बहुधा पेशवाई संपेपर्यंतच्या आहेत. त्याचा उपयोग किती असतो हे रा. रा. नानासाहेब चाफेकरांनीं ‘ पेशव्यांच्या सावलींत ’ हे पुस्तक लिहून दाखविलें आहे. वैद्यांच्या जमाखर्चाचें एक पुडकें त्यांस मीच दिलें होतें, दफतराचा उल्लेख त्यांत केला आहे.

( ११ ) इतके निरनिराळ्या प्रकारचे, पुष्कळ कागद एकाच घराण्याचे दफतरांत सांपडले आहेत.

अशा विस्तृत दफतराचा पूर्ण उपयोग करणें माझ्यासारख्या अनभिज्ञाच्या व वयोवृद्धाच्या आवाक्याबाहेर आहे. पूर्वजांच्या पुण्याईनें आयुष्य लाभल्यास त्याचा विनियोग दफतरांतील जितके उपयुक्त कागद उजेडांत आणतां येतील तितके आणावें, अशी इच्छा आहे व ती श्रीरामचंद्राच्या कृपेनें पूर्ण होईल अशी आशा आहे.

शंकर लक्ष्मण वैद्य



श्री ( पत्र फाटल्यामुळें श्रीकार दिसत नाहीं )

*No. 1*]

शके १५६३।६४

सन १६४१।४२

फर्मान-हुमायून[1] शरफ[2] शुहुर्याफ्त[3] बजाने × × × बइजत[4] व रफायत[5] दस्तगाह[6] × × × हवालदार व कारकुनानी व × × × × फाषाद मामले दाभोल सुहूर सन इसने आर्बैन व अलफ दामाजी गणेश खंडकर पिदर[7] येशा गणेश कायदेव बहुजुर[8] पुरनूर[9] बे येतेकाद[10] दुरुस[11] नोकरी मर्दोबकार पातशाही खर्चे सुबा[12] अजीसबब दामाजी गणेश बहुजुर लाम्यअननुर[13] अमदा[14] ईलतमाश[15] नमुद[16] बंदेदरगाहरा[17] वतन अज[18] ताा हमदाबाद देशकुलकर्ण व देहकुलकर्ण व दुदेह पटेलगी इनायतमऱ्हामत[19] फर्मायंद[20] आजीबाईस हजरत[21] जिलसुभानी[22] बमोजीब अर्जेबंदे पातशाही व कारअमदानी[23] खातीर[24] आउद्दा[25] देशकुलकर्ण व देहकुलकर्ण देह ६० साठ व पटेलगी दुदेह मौजे वाहाली व तलसर वतन मोकरकर्दा[26] अैनायत मऱ्हामत फर्मुदाअंद[27] कसबासाखर्डे, मौजे कुडप, मौजे डेरवण, तलसर, मुडे, फुरुस, कोसबी, कुटेर, येगांव, नांदगांव, हकुणी, आहतखोल, आगवे, असुर्डे, कुसिवडे, खेरसेत, कोकरे, माडकी, दहिवलीखुर्द, दहिवली बु॥, खरवते, वोहाली ढाकरवली, तुबाड, पालवण, निवली, आबीटगाव, ढाकवली, खडोत्री, वालेरी, हिरबे, तोडलीकासरगावयो, पिलवली, पुरीये वीर, पढाहे, कासे, असोद, नारडुवे, कलबुसी, वाहाल, वडेत, नाइसी, दुर्गवाडा, तलवेली, गोवल, मडकी, राताबी, राजवली, कुटकरी, पाचावे, पाथे, मला, पाथरपुज, कोलणें, ढाकवणे, बोलवण, गावरे, नाव, वाघणे, यासि मोईन.

---

१ पातशाही फर्मान किंवा सनद. २ श्रेष्ठ. ३ सादर होणें. ४ प्रतिष्ठा. ५ भरभराट ६ हस्तगत. ७ पितर. ८ यजमान. ९ प्रकाशयुक्त. १० विश्वास. ११ दुरुस्त. १२ म्हणून १३ बहुजुरपुरनूर. १४ येऊन. १५ विनंति. १६ केली. १७ हुजूरचा नोकर. १८ पासून १९ कृपा. २० सबब. २१ यजमान. २२ परमेश्वराची छाया. २३ कार्यास येणें. २४ मन २५ आणून. २६ निश्चितकरून. २७ फर्माविले आहे.

## हकगावगना दरसदे दाभोली लारिया[1] अडीच यो कलम १

### इनामती

इनामगाव मौजे — ठिकाणांत

तलसर १
गावगना रकम
इनामती
१५३ कोकणातील
गाव ५१ दरगावास
रकम लारी ३
तीन यो
३२ मुन्हेगाव ८
दरगावास रकम
टके ४ च्यार यो
१८५

१ कोडवाई गवला का़ा सावर्डे
१ मौजे डेरवण घोडे
पाटी २ यो ठिकाणा
१ मौजे नांदगांव सेत
रेव व माणखरी
१ मौजे आबीटगाव बाग
आंबे फणस नारळ
सुपारी
४
१ सेत माडप मौजे खरसेत

### कानुकानाती

गौलियास तूप
८८२ म्हैसी तानी
व पाडसी दरसालीना
तूप मापी
८८१ गाईस सालिना
वजन सेर मापी
८८३

कोष्ठी साली सालास
दर मागास पाटके[2] १ येक
सणगराचे मागास
कांबले १ येक सालिना
तेलियाचे घाणियास
तेल सालिना ८।. दाहा सेर

पानारीयाचे नगास
सालिना पानें १०० येकसे
कापड नगास लारी
१ येक

उसाचे घाणियास व काइलीस
घाणियास दररोज काइलीस गूळ
ऊस पाच पाच शेर

रंगारी याचे दुकानास
लारी १ येक
भूस गोणीस रुके दोनी ८२
लोणे जिनसास पाईण

दुकानास सालिना
लारी १ येक
खंड गुन्हेगारी
दरसदे लारी ५ पांच

---

१ लारी हे एक जुनें चांदीचें नाणें आहे. याचा आकार चिमट्यासारखा आहे. याची किमत सुमारे आठ आणे आहे. हे भा. इ. मंडळाचे संग्रहालयांत आहे. त्याच्या निरनिराळ्या जातीच्या असतात. उः-दामोळी लारी, खिराड लारी, श्रीगाऊ लारी. २ एकेरी रुंदीचें वस्त्र.

अर्जी मोजिब देशकुलकर्ण व देहकुलकर्ण पटेलगी दुदेह, वोहाली व तलसर व इनामत हक व लवाजिमा व ठिकाणात व मोहतर्फ व रोशन दरगांव मेश असर कुजदेसिया दरबार चरखदाहा असार व जकात गोणीस जितलब व अवलाद व अफलाद चलदेज्यारी साजद दरददार नकल गिरत्फ असलफर्मान बाजदरा हद हरसाल फर्मान मुजदद तलब नकद सन १०५२.

A Patshahi Farman to Damaji Ganesh Khandakar of Phagare containing the names of 60 villages of Kulkarni Vatan & two villages of Patilki Vatan & also of Inams and other rights.

---

*No. 2* ]

फा. शु. १३।१५८३
२०।२।१६६२

श्री ( पत्र फाटल्यामुळें श्रीकार दिसत नाहीं )

॥द

मशुरूल अनाम दामाजी गणेश खंडकर देसकुलकर्णी ता सावर्डे यासि राघोबलाल सुबेदार व कारकून मामले दाभोळ नमस्कार सुा इसने सीतैन अलफ तुम्ही सुभा येऊन विनंति केली कीं, अदलशा पातशाहा यांनीं आपणास साठ गावीचे देसकुलकर्ण व मौजे वोहाळी व मौजे तलसर दोनी गावीचे पाटिलकी वतन करून दिल्हे, त्याचा उपभोग करीत आहो. अशास महाराज राजेश्री




यास देस अर्जानी जाहाला. याकरितां अपण सेवेसी येऊन रुजू जाहालो. तरी स्वामीनी, अदलशा पातशहानीं वतनाचा फर्मान करून दिल्हा आहे त्याप्रमाणें हक व इनाम गाव व ठिकाणाती व कानुनाती अपले दुमाला करून देसकुलकर्णाची व पाटीलकीचे सेवा घेतली पाहिजे, म्हणऊन विनंति केली. त्यावरून मनास आणितां तुम्हास अदलशाहा पातशाहानी साठ गावींचे देसकुलकर्ण व वोहाली व तलसर चे पाटीलकी वतन करून फर्मान दिल्हा आहे. त्याप्रमाणें देसकुलकर्ण व पटेलगी व गावगना हक व इनामगाव व ठिकाणाती व कानुकानुनाती

---

हा शिक्का राघोबल्लाळ सुभेदार यानें केला आहे. तो नारायण गणेशाचा शिक्का कां वापरतो ? त्यांचें एकमेकांचें नातें आहे काय ? या सनदेवरून शिवाजी महाराज सनदा देत नसत असें होत नाहीं. १ हस्तगत.

दुमाला केल असे. वतनाचा उपभोग करून रुजू असणें. वतनाबद्दल तुमचे माथा सेरणी दाभोली लाहारी ३००० तिन हजार ठेविली. ते उगवणी करून देऊन वतन सुखरूप अनभवीत जाणे छ. १० रजबू मोर्तब सुद.

मोर्तब
शुधं

A Sanad was issued by Shiwaji to Damaji Ganesh Khandkar confirming the Kulkarni Vatan & Patilki granted by Adilshaha to him on condition of the payment of 3000 Laris.

---

*No. 3* ]

चैत्र व. १२।१५८७
२।४।१६६५

श्री ( हा श्रीकाराचा भाग फाटला आहे. )

राजश्री रामाजी बलाल हवालदार
व कारकून ता। सावर्डे गोसावी यासि

॥द

अखंडित लक्षुमी अलंकृत राजमान्य सेवक आवाजी माहादेऊ सुभेदार व कारकून प्रांत दाभोळ नमस्कार मु॥ सन खमस सीतैन आलफ सा॥ नमस्कार. साहेब छ ९ रमजान पो॥ छ २१ मिनहू तेथें आज्ञा कीं, रा॥ दामाजी गणेश देसकुलकर्णी ता॥ सावर्डे हुजूर येऊन विनंति केली कीं, साहेबी दीडसे १५० लाहारी देशकुलर्णास हक मोईन करून दिली, तेणेंकरून आपला योगक्षेम चालत नाहीं. आपण कुटुंबवछल अदलशाहा पातशाहांनीं हक इनामगांव व इनामती गांवगना व ठिकाणात व कानुकानुनाती करून दिल्या होत्या. त्याकरितां सौसारिक चालत होतें. दीडसेहे लाहारींनें आपलें चाळत नाहीं, तरी साहेबी जाजंती इनामाची मोईन करून दिली पाहिजे, म्हणऊन विनंति केली. येैसी यास दामाजी गणेश थोर मनुश, यांचें चालवावें हें साहेबास अगत्य आहे, परंतु हक जाजती करितां येत नाहीं, याचें चालवावें या करितां यास देसकुलकर्णीची मोईन पेसजी करून दिल्ही. त्या प्रा॥ पाववणें. याचा योगक्षेम चालिला पाहिजे. याकरितां यास दाभोळी लाहारीं ३०० तीनसेहे वर्षासन पाववीत जाणें म्हणऊन आज्ञा. आज्ञे प्रमाणें तुम्हास हें पत्र सादर केलें असे. तरी पेसजी देसकुलकर्णीचा हक मोईन करून दिली आहे त्याप्राणें पाववीत जाणें. या

खेरीज वर्शाशन दाभोली लाहरी ३०० तीनसे दिवाणांत खर्च घालून सालिना पावीत जाणे. जकात राहादारी व हक ८२ दोनी रुके प्रार्णे गोणीस रयत निसबत पावीत जाणें. ×× करून घेऊन असल मशारनुलेस परतून देणें. जाणीजे रा। छ २९ रमजान मोर्तब सुद.

This is a letter of Shiwaji's regime by Abaji Mahadeo Subhedar of Dabhol to Ramaji Balal, Havaldar of Sawarde to pay to Damaji Ganesh 300 Laris as varshasan in addition to his Vatan of Patilki & Kulkarnipan, as it is sanctioned by Shiwaji.

---

*No 4* ] श्री ( श्रीकार फाटला आहे )

भाद्रपद शु. ७।१६०५

१८।८।१६८३

राजेश्री कृष्णाजी विस्वनाथ हवालदार

व कारकून ता। सावरडे गोसावी यासि

सेवक बहिरो त्रिमल सरसुभेदार प्रांत दाभोल नमस्कार सुा आर्बा समानीन अलफ अम्ही राजश्री छत्रपति स्वामीचे दरशनास राजापुरास गेलो होतो. तेथून येऊन तरफ मजकुरी मुकाम केला. ते समई विठल दामोदर देसकुलकर्णी तरफ मजकूर येऊन भेटला नाहीं. याकरितां महिपत गडकरी यास लाहारी ५०० पाचसे बरात करून देविली. त्याचा बसूल देसकुलर्णी मजकुरानें देऊन भेटीस आला नाहीं. हजूर राजेश्री स्वामीकडे जाऊन वर्तमान विदित केलें, त्यावरून राजेश्री साहेबाचें आज्ञापत्र छ ५ जमादिलावल सादर जालें, तें पो छ २७ साबान. तेथें आज्ञा कीं, विठल दामोदर देस-कुलकर्णी ता। सावरडे यापासून लाहारी पाचसे बसूल घेतला आहे, याकडे लिगाड नसतां तुम्ही बरात करून पैसे घेतले. हे गोष्टी गैरमाकुल. ह्या करितां देसकुलकर्णी यासि पाचसे लाहारी परतोन देविली आहे. देणें. देसकुलर्णीयाचा अमल याचे हातें घेत जाणे म्हणून आज्ञा. यैसी यास विठल दामोदर देसकुलकर्णी राजश्री चें पत्र घेऊन सुभा आला नाहीं, येक दो रोजीं सिध होता, कमाविसी खाले पैंके जमा होऊन गेले, करितां यासि दीडसे लाहारी हक द्यायाची मोईन आहे. त्या खेरीज ज्याजती मोईन लाहारी ५० पनास करून दिल्ही आहे. येकूण दोनीसे लाहारी मोईन पावीत जाणे. जकातीस हकदारी दोनी रुके मोईन आहे. त्याप्रमाणें चालवीत जाणे. देसकुलकर्णास मुतालिक

सुभाहून पाठविला होता, तो दूर केला असे. मशारनुइलेचे हातें देसकुल्कर्णाचा अमल घेत जाणे. छ ५ माहे रमजान

मोर्तब सुद

This is a letter by Bahiro Trimal Sarsubhedar of Dabhol to Krishnaji Vishwanath Havaldar of Sawarde asking him not to recover the fine imposed on Vithal Damodar for his absence, which is remitted by Chhatrapati Sambhaji and pay him 200 Laris and also not to obstruct the enjoyment of his rights by appointing a new man.

हे संभाजीच्या काळचें पत्र. यावर मोर्तब आहे.

---

*No.* 5 ] श्री

तालिक
माघ शु. ६।१६०७
१९।१।१६८६

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १२ क्रोधननाम
सवंतसरे माघ शुध शष्ठी भोमवासरे राजश्री

शिक्का

महादाजी नारायेण देशाधिकारी व
लेखक प्रांत दाभोल

यासी राजाज्ञा ऐसीजे. राघो विठ्ठल हुजूर येऊन विदित केलें, ता॥ सावर्डे येथील देशकुलकर्ण आपलें वतन चालवीत असतां रा॥ बहिरो त्रिमल सुभेदार याही दुसरा लिहिणार ठेविला. त्यावरी आपले पिते देबरुखचा हवाला करून गेले, तरी स्वामीनें आपलें देशकुलकर्ण आपले स्वाधीन केलें पाहिजे, म्हणोन विनंति केली. तरी त्याचें देशकुलकर्ण काढून दुसरा ठेविला काये बद्दल? तर यैसें न करणें. याचें देशकुलकर्ण याचे स्वाधीन करणें. सुभाहून लिहिणार ठेविला आहे, तो दूर असे. याचे हकदक भोगवटियाप्रमाणें देत जाणे. दुसरीयानें हुजूर बोभाट येऊं न देणे. जाणीजे छ ४ रबिलावल सुहूर सन सीत समानीन अलफ

Mahadaji Narayan, the Prant Officer of Dabhol was ordered to remove the new man appointed by Bahiro Trimal in place of Vithal Damodar and allow Vithal Damodar to enjoy his Vatan without obstruction.

---

*No. 6* ] ( वरील मजकूर फाटला आहे. )




१० जमादिलाखर
माघ शु. ११।१६१३
१८।१२।१६९६

शा पात शायै ही तपे[१] मजकूर व देशकुलकर्ण फर्मानी वतन करून दिल्हें आहे. या वतनासी गावगना हक व इनामगाव व गावगना इनाम, ठिकाणाती व कानुकानुनाती[२] व मौजे तलसर व वाहली या दोन्ही गांवी पाटेलगीयाचें वतन देऊन फर्मान करून दिल्हे आहे. त्याप्रमाणें भोगवटा आपल्या वडिलाही केला. आपण ही करीत आहो. त्यास माहाराज राजश्री कैलासवासी थोरलेस्वामी याही हा प्रांत[३] हस्तगत केला, ते प्रसंगी राघो बलाळ प्रांत मजकुरी काबिजातीस[४] पाठविले होते, तेही माहलोमहाल ठाणीं बैसविलीं आणि देशाची कमाविश करूं लागले. त्याप्रसंगीं आपले बापासून तीन हजार लारी वतन मुले घेतली आणि मारनिलेनें आपलें पत्र व हुजुर माहाराज राजश्री थोरले स्वामीची आपल्या बापाची भेट करून वतनाचें दुमालें पत्र करून दिल्हें, त्याप्रमाणें वतन अपल्या वडिलाही व आपण चालवीत आहे. त्या अलाकडे[५] राजश्री आबाजी माहादेव सुमेदार प्रांत मजकुरी होते, त्यांचे कारकिर्दीस बटाई[६] जाली. ते प्रसंगीं कुली वतनदाराचे हकइनामगाव इनामठिकाणाती, कानुकानुनाती अमानत करून दिवाणांतून हकाच्या मोइनी करून दिल्हे. त्याबा आपलें इनामगाव इनामठिकाणठिकाणाती व गावगना हक व कानुकानुनाती अमानत[७] करून दिवाणांतून गावगना हक सालिना दामोली लारी १५० दीडसे व जकातीस हकाची मोइन[८] करून दिल्ही. त्याप्रमाणें आपण हक घेऊन देश-

---

१ तरफ: २ करपट्टी वगैरे हक्क ३ प्रांत दाभोळ, सुवर्णदुर्ग हा दक्षिण कोकणाचा भाग शिवाजीनें १६५३ मध्यें हस्तगत केला ४ कामास ५ अलीकडे ६ साऱ्याची व्यवस्था ७ सरकार जमा ८ नेमणूक, ठराव, तैनात.

कुलकर्णाचें वतन व पाटेलगी सदरहू गावाची चालवीत असतां अलीकडे राजश्री संभाजी राजे याही राजेश्री बहिरो त्रिमल प्रांत मजकुरास सा सुबेदार पाठविले होते. तेही आपणापासून वतनामुळें पाचसे लारी घेतली. याकरितां हुजूर राजश्रीकडे जाऊन आपला करीना विदित केला. त्यावरून मनास आणून पाचसे लारी परतून देणें, म्हणून हुजरून पत्र दिल्हे. तें घेऊन माहालास आलो. बहिरो त्रिमलास पत्र दिल्हे. त्यास पाचसे लारी मागत होता; परंतु दिल्या नाहींत. मग हक जाजती करणें म्हणून त्याजपासी अर्ज केला. त्यावरून त्याही मनास आणून आपणास हक गावगना कदीम दाभोली लारी १५० दीडसे होती ते व जाजती लारी ५० पनास येकूण दोनीसे लारी गावगना करून दिल्हे व जकातीस हक पेशजी आबाजी महादेवाचे कार्कीर्दीपासून चालत आहे त्या मा। चालवावयाची आज्ञा केली. तेणेप्रमाणें गावगनाचा व जकातीचा हक खाऊन देशकुलर्णाची सेवा करून आहो. त्यास आपणापासी फर्मान आदलशाही व माहराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामी व संभाजीराजे व राघो बलाल व आबाजी माहदेव व बहिरो त्रिमल यांचीं पत्रें होतीं तीं धामधुमेच्या प्रसंगाकरितां जागोजागा ठेविलीं होतीं. अशास अलीकडे भालेरायाचा प्रसंग जाला. ते प्रसंगीं आपलें घर नांदगावीं होतें तेथें मुला माणसनसीं राहत होतो. त्यास येकायेकी भालेराऊ याची स्वारी रात्रीं आपल्या घरावरी आली. आपण मुलेमाणसें जीव मात्र घेऊन पळोन सारंगडास गेलो. मागें घर त्याही जालिलें. त्यास आपणापासी थोरले कैलासवासी व राजश्री संभाजी राजे यांचीं पत्रें होतीं ते घरांत जलालीं. वरकड कागद व आदलशाही फर्मान आपणापाशीं आहेत. अशास हा वतनी प्रसंग आहे, यास्तव थोरले कैलासवासी राजश्री संभाजी राजे याचीं पत्रें जळलीं, याकारिता स्वामीनें आपलीं पत्रें करून दिल्हीं पाहिजेत व आपण या राज्याशीं निस्टा धरून सेवा करीत आहे. कुटुंबवछल आहे. दोनीसे लारी हक आहे तेणेंकरून अैकात[१] चालत नाहीं. या कारितां जाजती हकाची मोईन करून दिल्ही पाहिजे, म्हणून या ही विस्तरें विदित केलें. त्यावरून मनास आणितां देशकुलकर्णी मजकुरापासी अदलशाही फर्मान व वरकड पत्रें राघोबलाल व आबाजी महादेव व बहिरो त्रिमल यांची आहेत. महाराज राजश्री थोरले कैलासवासी व राजश्री संभाजी राजे यांची

---

१ वेळ

पत्रें होतीं तीं जळालीं याकरितां व यांनीं आपल्या इनामास खता होऊं न देतां धामधुमेच्या प्रसंगांत कबिल्यानसी सारंगडाहून[1] सेवा केली आहे, या करितां हें तुम्हास पत्र सादर केलें असे. तरी देशकुलकर्णी मजकुराचें वतन देशकुलकर्ण तपेमजकुर व पाटेलगी मौजे वाहली व तलसर या दोन्ही गांवींच्या, यांचें वतनबाा फर्मान, कार्कीर्द अदलशापासून ताा भोगवटा साल-गुदस्ता चालत आहे, त्याप्रमाणें यास व यांचें पुत्रपौत्रादि वौशपरंपरेनें सुरक्षित चालवीत जाणें, या देशकुकर्णाच्या वतनास हक गावगना पेशजी मोईन सालिना दाभोली लारी २०० दोनीसे चालत आहे. त्याखेरीज जाजती हक सालीना लारी ५० येकूण लारी २५० अडीचसे रास करून दिल्हा आहे. या खेरीज जकातीस हकाची मोईन ताा साल्गुदस्ता चालत असेल, त्या प्रमाणें सुरलीत चालवणें. माारनिलेयास राजश्री थोरले कैलासवासी यांचीं पत्रें होतीं तें जलालीं व जाजती हक करून दिल्हा आहे, याकरितां यांच्या माथा सिर्णी[2] दाभोली[4] लारी १५०० दीड हजार ठेऊन उसूल हुजूर घेतला असे, हें जाणोन सदरहू प्रमाणें चालवीत जाणें, नवनि पत्राचा आक्षेप प्रतिवर्षी करिता नव[3] जाणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन असल पत्र परतून भोगवटीयास देशकुलकर्णी मजकुरा जवेली देणें. छ १० जमादिलाखर निदेस समक्ष.

लेखन
सीमा संमु
ल्लसती

सुरूसुदबार
पैवस्ता छ २० जमादिलाखर

This is a Sanad granted by Rajaram Chhatrapati to Khandkar alias Phagare for the Vatan of Deshkulkarna and Patilki of Talasar and Wohali. At this time Ramchandra Nilkant was in power and Nilo Sonadeo was dead. Still Ramchandra used the stamp of his father, Nilo Sonadeo, whose stamp is rarely found.

---

१. बायका २. शेरणी, नजराणा. ३. न. ४ याशिवाय बसरा लारी ही प्रचारांत असे. निळोसोनदेवाचा शिक्का जोश्यांच्या लेखनालंकारांत नाहीं. हा १६७२ मध्यें वारला.

*No. 7* ]

श्री

भाद्र. शु. ८।१६१७
६ सप्टेंबर १६९५

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमा-
न्य राजश्री विटल गोपाल समासद
नामजाद व कारकुन सुभा दाभोल गो-
सावी यांसि:-

सेवक रामचंद्र नीलकंट अमात्य. नमस्कार. सुहुरसनसी-
त तिसैन व अलफ. राघो विठल दफ्तरदार दिमत मजमू
याही हुजुर विनंती केली की आपले आजे दामाजी गणेश, या-
चे बाप, गणेश कायदेव यापासून मौजे तलसर व मौजे डोरव-
ण ता। सावर्डे खोती चालवीत होते. ऐसीयास राजश्री कै-
लासवासी साहेबास[1] मुलक अर्जानी[2] जाहाला. त्यावर बटाई[3]
केली. याकरितां व आपले वडिलास खंडदंड पडिले यामुळें
खोती चालवावया ताकत नाहीं. दिवाणचा बोढा सोसवेना.
तैसाच तलसरामध्यें गणोबा पुसालकर मुतालिक होता त्या-
च्यानेंहि कारबार चालवेना ऐसें जाहालें. त्यास आपले आजे
दामाजीपंत श्री यात्रेस गेले. आपले बाप विठल दामोधर ले-
कुरवे होते त्याच्यानें आटोप न करवे, याकारणें सावर्डेप्रांत
सोडून पाथर्डीवोहालीं चुलते याचेपासीं जाऊ (न) राहिले. त्या-
वर लोकाही खोतिया चालविल्या. ऐसियास आपले गाव पुरा-
तन, या उप्पर आपणास चालवावयाची हिमत आहे तरी
स्वामीनें कृपाळु होऊनु आपले स्वाधीन करविले पाहिजे,
म्हणून. त्यावरून तुम्हांस आज्ञापत्र सादर केले असे तरी यां-
[ उलटून ]
चे आजे दामाजी गणेश, याही चालविले असिले तर, यांचे

---

१ छत्रपति महाराज. २ हस्तगत. ३ मोजणी.

या पत्रांत खंडकरांची ५ पिढ्यांची वंशावळ आहे. या पत्रांची नक्कल एपिग्राफी तज्ञ रा. सा. य. रा. गुप्ते यांनीं मुद्दाम करून दिली आहे. हा एक त्या खात्यांतील नक्कल करण्याचा नमुना आहे.

सदरहु गाव दुमाले करणें आणि यापासून खोतीचा माम—
ला घेणें सालमजकुरचे उगवणी ह (हं) गामसीर हाली ज्यास खोती
असेल त्यापासून करुन घेणें आणि पेस्तर सालीचे कीर्दी
कारणे मारनुलेचे दुमाला करणें हक हिसाहि मनास आणू—
न हवाला करणें. जाणिजे. छ ६ सफर

लेख
नावधिरा
जते

सुरुसुद

It is a letter by Ramchandra Nilkant Amatya to Vithal Gopal an officer of Dabhol district to regrant the Khoti Vatan of Tulsar & Dorwan to Ragho Vithal Khandkar, which, his forefathers had left owing to adverse circumstances.

---

*No. 8* ] श्री भाद्रपद व. ९।१६१७
२१ सप्टेंबर १६९५

राजश्री वाघोजीराव व संभाजीराव
व प्रतापजीराव शिर्के गो यांसि.

॥द

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य
स्नेहांकित रामचंद्र नीलकंठ अमात्य आसि—
र्वाद शुहुर सन सीत तिसैन व अलफ मा वि—
टल दामोधर देश कुलकर्णी ता सांवर्डे सुभा दाभो—
ल यांणीं विनंती केली कीं, पूर्वी मुलुक आबा—
दन होता ते समई हक महालमुलें पावत होता
सांप्रत धामधुम जाहालीयाप्रसंगें गाव जिक—
डे तिकडे दिल्हे, येणेंकरून ते हक पावो देत नाहीं. चाक—
री तरी येकंदर सुटत नाहीं, या करितां साहेबी
कृपाळु होऊनु ज्याकडे गाव आहेत त्याकडून
हक पावावया आज्ञा केली पाहिजे म्हणून. त्याव—
रून हें पत्र तुम्हास सादर केलें असे. तुम्हाकडे
सावर्डे विलायतीचे[१] गांव जे जे असतील त्यावर जो

---

१ परगण्याचे, प्रदेशाचे.

हक येईल तो तुम्ही बिलाकुसुर देशकुलक-
र्णी मजकुरास पावीत जाणें. फिरोन बोभाट ये-
ऊं न देणें. जाणिजे. छ २१ सफर पा हुजूर

लेख
नावधिरा
जते

*

उलटून

श्री
सीतापति च
रण नीलकंठा
त्मज रामचंद्र
शरण

सुरू सुद

It is a letter addressed to Shirkes by Ramchandra Nilkant Amatya, not to withhold the revenue of Deshkulkarna of Sawarde District & pay the same to Vithal Damodar Khandkar.

---

*No. 9*]

तालीक
श्रा. व. १।१६३०
२२।७।१७०८

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे श्रावण वहुल प्रतिपदा गुरुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्रीराजा सिवछत्रपती यांणीं राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी प्रांत पनाळा यासी आज्ञा केली ऐसीजे. रा सुंदर तुकदेव हे स्वामींचे कदीम शेवक, या राज्यांत कष्ट मेहनत बहुतच केली, याजकरितां मौजे बहे ता वालवे हा गांव इनाम अजरामऱ्हामत[2] करून दिल्हा. त्या उपर त्याचे पुत्र येशवंतराव सुंदर होते, त्यास मौजे मजकूर इनाम चालवावयाविसी आज्ञा केली होती. सांप्रत ते मृत्य पावले. त्याचे भाऊ सुंदर तुकदेव, याचे पुत्र कनिष्ठ,

शिक्का

---

१ बिनहरकत. २ कृपादत्त, बक्षिस

* जोशी यांच्या लेखनालंकाराच्या पुस्तकांत अमात्याचा निराळा शिक्का आहे.
या पत्राची नक्कल रा. सा. य. रा गुप्ते यांनींच करून दिली आहे.

राजश्री त्र्यंबकराव सुंदर आहेत. त्यांचें वंशपरंपरेनें चालवणें, हें स्वामीस अगत्य, याकरितां मौजे मा॥रमुहेलेस इनाम बिलाकुसुर[१] चालवावयाची आज्ञा केली आहे. तरी तुम्ही हें जाणून मौजे बहे प्रांत मा॥र हा गांव त्र्यंबकराव सुंदर यास पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम बिलाकसुर कुलबाब कुलकानू चालवणें. या पत्राची प्रत लेहून घेऊन मुख्य पत्र मा॥रनिल्हेजवळ परतुन देणें. लेखनालंकार मोर्तब.

रुजू सुरनिवीस

सुरूसुद बार

This is one of the earliest Sanads granted by Shahu to Tryambak Sunder for the inam village of Bahe. His father was a Diwan of Raja Karna, an illegitmate son of Rajaram and an enterprising person. He was useful to him like Ramchandrapant Amatya and Pralhad Niraji to save the Maratha Kingdom.

*No. 10* ]

श्री

मार्गशीर्ष ब ४।१६४७

१२।१२।१७२५

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५१ क्रोधीसंवत्सरे मार्गशीर्षबहुल चेतुर्थी रविवासरे क्षत्रियेकुलावतंस श्री राजाशाहुछत्रपति स्वामी यांणीं देशमुख व

० श्री ✓
राजा शाहु नरप
ति हर्ष निधान बा
जिराव बलाळ
मुख्य प्रधान

० श्री ✓
श्री आई आदि पुरु
ष श्री राजा शाहू छत्र प
ति स्वामी कृपा निधीत
स्य श्री निवास परशु
राम प्रतिनिधी

मोकदमांनी ता॥ सावर्डे मामले हमदाबाद पा॥ दाभोळ यांसि आज्ञा केली यैसी जे, राघो विठ्ठल खंडकर उर्फ फगरे देशकुकर्णी व गावकुलकर्णी ता॥ मजकूर यांणीं किल्ले सातारीयाचे मुकामीं येऊन हुजुर विदित केलें कीं, ता॥ मजकूरचे देशकुलकर्ण व गावकुलकर्णाचें

---

१ बिनहरकत. ● हा शिक्का अष्टकोनी आहे.

त्र्यंबक सुंदर यांचें मूळ आडनांव देव ऊर्फ ठोंबरे. यांचें एक वंशज हणमंतराव बाजी देव याजपाशीं अस्सल सनदा व कागद येकूण २१ होते, असें वैद्य दफ्तरांतील कागदांत असून त्यावर मिति कार्तीक शु. ६।१७७१ आहे. मंडळाकडे वैद्यांच्या दफ्तरांतील हे कागद रा. आबा चांदोरकर यांनीं दिले आहेत.

वतन पुरातन आपलें आहे, आपले वडिल वतन चालवीत आले आहेत, त्यास त्या प्रांतें धामधूम झाली, त्या प्रसंगीं देश सोडून या प्रांतास आलों, सेवावृत्त करून आहो, हालीं वतनाची सेवा करावी यैसी उमेद धरिली आहे, तरी स्वामींनीं कृपाळू होऊन आपणास अभयेपत्र करून देऊन वतनाची सेवा करावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणोन. त्यावरून मनास आणून यासि ता॥ मजकूरचे व गाव कुळकर्णाची सेवा करावयाची आज्ञा केली आहे. तर तुम्ही याजपासून सदरहू वतनाची सेवा घेऊन हक व लाजिमा व इनाम पेशजीच्या भोगवट्या प्रो सुरलित चालवणें या पत्राची प्रती लेहून घेऊन असल पत्र भोगवटीयासि प्रतोन देणें. जाणीजे. लेखनालंकार रुजू सुरू- सां सां

निवीस मंत्री सरकार

मर्या
देयं रा
जते

बारसुद सुरूसुद बार बार बार

A Sanad was granted by Shahu to Ragho Vithal Khandkar for his former Vatan which was lost owing to troublous condition of the district.

---

*No. 11* ]

श्री

२३ सौवाल
ज्येष्ठ वद्य ९।१६४८
१३।६।१७२६

नकल बा॥ असल

आज्ञापत्र राजश्री सरखेल ताहा खोत पाटील मौजे बुरंबाड ता॥ संगमेश्वर सुहूर सन सीत अशरीन मया व अलफ. मौजे मजकुरीं दादभट आगासे यांचें घर व म्हैसी आहेत त्याविसी गणेश दादाजी ब्राह्मण दि॥ पंतप्रधान यांनीं अर्ज केला त्यावरून यासी घर व म्हैसी

घर १ म्हैसी २

सदरहू घर व म्हैसीचें देणें सोडिलें असे. साल दरसाल याजवलोन घेत नवे[1] जाणें. जाणिजे. रा॥ छ २३ सवाल.

An order of Kanoji Angre to the Khot of Burumbad exempting Dadabhat Agashe from House tax and Buffalo tax.

---

१ नव = न. आंग्र्यांचे राज्यांत घरपट्टी व जनावर पट्टी घेत असत.

No. 12 ]

श्री

नकल

गुरुवार
मार्गशीर्ष शु. ५।१६४८
१७।११।१७२६

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ५३ पराभवनाम सवछरे मार्गसीर्ष श्रुा ५ पच्यमी गुरुवासरे क्षत्रिय कुलवंतस श्रीराजाशाहू छत्रपतिस्वामी.

सिका
सिका

यांणीं मोकदमानी मोजे कासारी ता सैतवडे प्रांत राजापूर यासि आज्ञा केली, ऐसीजे

रा भास्करभट वैद्य बिन रघुनाथभट वैद्य यांचा योगक्षेम चालिला पाहिजे, याज निमित्यें स्वामी याजवर कृपाळू होऊन मौजे मजकुरीं इनाम जमीन भातसेत अवल, दुम, सीम तीन प्रतींची, पड जमीन बिघे ३ तीन बिघे कुलबाबकुलकानू[1] देखील हालीपटी व पेस्तरपटी, खेरीज हकदार यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें नूतन इनाम करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकुर पैकीं सदरहू प्रो चतुःसीमापूर्वक याचे दुमाले करून देऊन यांस व यांचे वंशपरंपरेनें इनाम चालवणें, प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन हें पत्र भोगवटियास मारनिल्हेकडे परतोन देणें. लेखनालंकार. मोर्तब

| रुजू सुरु[2]— | समत | समत | समत |
|---|---|---|---|
| निवीस | सुमंत | मंत्रि | सरकार |

तेरीख छ ३ राकर सुासबा अखेर.

बार सुरुसुद सुरूसुद बार बार बार बार

A Sanad to Bhaskarbhat Vaidya by Shahu Chhatrapati for the grant of inam land at Kasari.

---

१ सरकारी सर्व हक्क व कर. २ सचीव.

*Ne. 13* ] श्री मार्ग. शु. १२।१६४८

२५।११।१७२६ सबाअसरीन




॥द

राजेश्री खोतानी व मुकादमानी व पाटील देहाये ता। सावर्डे पा। हमदाबाज सुभा प्रांत दाभोळ यासि देवजी राजे सिरके देशमुख मामले दाभोल सु॥ सबा असरीन मया व अलफ. राजश्री राघो विठल खंडकर ऊर्फ फगरे देशकुलकर्णी व गावकुलकर्णी ता। मा।र यांणीं हुजूर महाराज राजश्री छत्रपति स्वामीजवळ येऊन विदित केलें कीं, ता। मा।रचें देशकुलकर्ण व गावकुलकर्णाचें वतन आपलें आहे, आपले वडील वतन चालवीत आले आहेत, त्यास त्या प्रांतें धामधूम जाहाली, त्याप्रसंगीं देश सोडून या प्रांतास आलों, सेवावृत्ति करून आहों, हालीं वतनाची सेवा करावी ऐसी उमेद धरिली आहे, तरी स्वामींनीं कृपाळू होऊन आपणास अभयेपत्र करून देऊन वतनाची सेवा करावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणोन. त्यावरून मनास आणून यासी ता। मजकूरचे व गावकुलर्णाची सेवा करावयाची आज्ञा केली आहे, तर तुम्ही याजपासून सद(र)हू वतनाची सेवा घेऊन हकलाजिमा व इनाम पेसजीच्या भोगवटचा प्रा। सुरलीत चालवणें म्हणोन आज्ञा. क्रोधी सवत्सरे मार्गसीर्ष बहुल रविवासरे व सनद राजश्री पंतप्रतिनिधि

छ १ रावल पौ। छ ११ जाखर सु॥सबा असरीन मया व अलफ, त्यावरून ता। मजकूरचें देशकुलकर्ण व गावकुलकर्ण याचे दुमाला केले असे, तरी हे वतनाची सेवा दंडक प्रमाणें करितील. यांचे हक व इनाम कदीम असेल ते भोगवटिया-प्रमाणें चालवणें. छ १९ रबिलाखर




This is an order issued by Deoji Raje Shirke, the subhedar of Dabhol, to the Khot, mokadam and Patil of the villages to continue the Deshkulkarn and Gaokulkarna of the district of Dabhol to Ragho Vithal Khandkar alias Phagare in accordance with the Sanad granted by Shahu Chhatrapati.

---

हा हुकूम खोत, मोकदम व पाटील या तिघांस आहे. यावरून हे तिघे निरनिराळे हुद्याचे गांवकामगार निरनिराळीं कामें करणारे असावे लागतील.

*No. 14* ]

समान अशरीन सफर.
अश्वीन व. ८।१६४९.
२७।९।१७२७

श्री

श्री
कानोजी राजे
सिरके देशमु
ख सुभेदार स
मत दाभोल

राजश्री राघो विठल व लक्षुमण विठल खंडकर उर्फ फगरे देशकुलकर्णी ता॥ सावर्डे गोसावी

॥द श्रो रो कानोजी राजे सिरके व बहिरजी राजे सिरके व उदाजीराउ सिरके व बाजीराउ सिरके राम राम उपरी सु॥ समान असेरीन मी व अलफ. देशकुलकर्ण व गावकुलकर्ण ता॥ मजकुरचें पुरातन तुमचें वतन तुम्ही अनभवीत असतां, धामधूम जाहली, यामुळें देशांत गेलेस, हालीं तुम्ही वतनावरी येऊन सेवा करावी हे उमेद धरून आमचे दरर्शणास आलेस, वर्तमान विधित केलें. मनास आणून तुमचें वतन तुमचे दुमाला केलें आसे. वतन अनभऊन सुखें असेणें. हकलाजिमा पानमान घेऊन वतनाची सेवा करीत जाणें. रवाना छ २२ सफर. सद्रहू प्रमाणें माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचें व राजश्री पंतप्रतिनिधी यांचें आज्ञापत्र सादर आहे. त्याप्र॥ तुम्हास पत्र दिल्हें असे. वतन अनभऊन सुखरूप असणें. जाणिजे. बहुत काये लिहिणें

मोर्तब
सुद

The Shirkes write to the two Khandkar brothers informing that an order is issued by Chhatrapati and Pratinidhi granting them this old Vatan.

---

या पत्रावर शिरक्याचा शिक्का आहे. पत्र नं. १३वरील शिक्यापेक्षां निराळा दिसतो. पण नं. १५ मधील शिक्का यासारखा आहे.

*No. 15* ]

श्री

आश्वीन व. ८।१६४९
२७।९।१७२७

आज्ञापत्र राजश्री कानोजी राजे सिरके व रो बहिरजी राजे सिरके व रो उदतसिंग राजे सिरके व रो बाजी राजे सिरके ता खोतानी व मुकादमानी व बलुते यांनीं देहाय गावगना ता सावर्डे

श्री ०
कानोजी राजे
शिरके देशमु
ख सुभेदार स
मत दाभोळ

कसबासावरडे, मौजे कुडप, मौजे डेरवण, मौजे तळसर, मौजे मुढे, मौजे फनस,
१ १ १ १ १ १
मौजे कोसबी, मौजे दुरगवाडी, मौजे तळडे, मौजे गोवळ, मौजे मनुची,
१ १ १ १ १
मौजे पाथे, मौजे रातांबी, मौजे राजिवली, मौजे कुसारी, मौजे पाचाबे, मौजे मळा,
१ १ १ १ १ १
मौजे पाथरपुज, मौजे डाकबदे, मौजे वोलवण, मौजे भोळणे, मौजे वाघणे,
१ १ १ १ १
मौजे गोवारे, मौजे नाव, मौजे कुटरे, मौजे येगाव, मौजे नांदगाव, मौजे कुसिवडे,
१ १ १ १ १ १
मौजे हडकणी, मौजे असुर्डे, मौजे माडकी, मौजे दहिवलीखुर्द, मौजे डोकरवली,
१ १ १ १ १
मौजे पाळवण, मौजे निवली, मौजे कोकरे, मौजे खेरसेत, मौजे नाइसी,
१ १ १ १ १
मौजे वडेरू, मौजे आबीटगाव, मौजे ढोकमली, मौजे वाडोत्री, मौजे वलेरी,
१ १ १ १ १
मौजे सिरबे, मौजे वाहाल, मौजे कलबुसी, मौजे कासे, मौजे असवे, मौजे नारटुवे,
१ १ १ १ १ १
मोजे पेडाबे, मौजे वीर, मौजे पुरये, मौजे पिलवली, मौजे तोडली, मौजे आगवे,
१ १ १ १ १ १
मौजे आबातखोर, मौजे मळासावर्डे,
१ १

सुरू सन समान असेरीन मीयावलफ. राघो विठल व लक्षुमण विठल खंडकर उर्फ फगरे देश कुलकर्णी व गावकुलकर्णी देहाय मजकूर, हे धामधुमे करितां घाटावर गेले होते, ते हालीं आपल्या वतनाचे कामावर उमेद धरून आले, आपलें सविस्तर वर्तमान विधित केलें त्यावरून आम्ही मनास आणून यांचें वतन यांच्या स्वाधीन केलें असे. तर तुम्ही व हे येक विचारें राहोन वतनाची सेवा करणें.

याचा हक व लाजिमा पानमान जो असेल तो चालवणें. उजूर न करणें. ये विसी माहाराज राजश्री छत्रपति स्वामींचें व राजश्री पंतप्रतिनिधी यांचे आज्ञापत्रें आलाहिदा सादर आसत. त्याप्रमाणें चालवणें जाणीजे. छ २२ सफर मोर्तब सुद




An order was issued to Khots & Mokhadams, by Shirkes who were in charge of the district, to take service from Ragho & Laxman Khandkar according to the dictates of Chhatrapati and Pratinidhi.

---

*No. 16* ] श्री

९ जमादिलावल

नकल माघ शु. ११। १६४९

११।१।१७२८

स्वस्तिश्रीराज्याभिषेक शके ५४ प्लवंग सवत्छरे माघ शुा येकादसी गुरुवासर क्षत्रियकुलावतंस

श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांणीं

सिका सिका वो भास्करभट बिन रघुनाथ भट उपनाम वैद्य गोत्र गारिग्य

सूत्र आश्वलायन वास्तव्य मौजे लावगनवैद्य यासी दिल्हें इनामपत्र ऐसीजे. तुमचें वंशपरंपरेनें चालविणें आवशक जाणून स्वामी तुम्हांवर कृपाळू होऊन मौजे नरवण ताा गोहागर प्रांत दाभोल येथें पडजमीन बिघे ८१० दाहा बिघे भातसेत कुलबाब कुलकानू देखील तिजाई व हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार, तुम्हांस तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम करून दिल्हा आसे. चतुःसीमापूर्वक सदरहू दाहा बिघे जमीन आपले दुमाला करून घेऊन वंशपरंपरेनें इनाम अनुभवून सुखरूप राहाणें. जाणिजे. लेखानालंकार मोर्तब सुद.

रुजू संमत सुमंत साा मंत्री साा सरकार

तेरीख ९ माहे जमादिल्हाखर

सुाा समान

बार सुद सुरूसुद बार बार बार बार

A Sanad by Shahu to Bhaskarbhat Vaidya, granting in inam 10 bighas of waste land of Narawan.

---

*Ne. 17* ]

श्री

सिका नकल

जे. व. २ शके १६५०
१२।६। १७२८

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजश्री कान्होजी आंग्रे सरखेल ताहा सांडे मौजे लावगन तर्फ सैतवडें प्रां राजापूर. सुरुसन तिसा अशरीन मीयाअलफ. वेदमूर्ती भास्करभट वैद्य यांणी सातारचे मुकार्मी येऊन विनंति केली कीं, मौजे मजकुरी खारी जमीन खाजण व दर्यागर्क, आहे, त्यास बांदबंदस्ती करून नूतन खार करून जमीन बिघे ८२ दोन बिघे होईल. त्याचा राजभाग होईल तो कृपाळू होऊन आपणांस धर्मादाय देवावा, म्हणोन विदित केलें, त्याजवरून आज्ञा केली असे. दोन बिघे जमिनीचा पेस्तर खार मुस्तेद[1] जाहल्यावर आकार होईल तो भट गोसावी यांचे नांवें साळदरसाल खर्च लिहित जाणें. नूतन पत्राचा आक्षेप न करणें. तालीक लेहून घेऊन असल भोगवटीयास परतोन देणें. रा। छ १४ मोर्तब असे.

An order by Kanoji Angre granting to Bhaskarbhat Vaidya in inam a salt land of Sande Lawagan after it is reclaimed.

---

*No. 18* ]

श्री

पैवस्ती आश्विन वद्य ८।१६५१
४।१०।१७२९

वेदशास्त्र संपन्य राजश्री भास्कर
बावा स्वामी गोसावी यासि

द॥

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य

श्री देवजी सोमवंशी हिंदुराऊ दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत आसिलें पाहिजे. विशेष. चिरंजिव राजश्री हैबतराऊ आले, यांनीं वर्तमान सांगितलें कीं, तुम्ही आमचे ठाई सर्व प्रकारें ममता धरून प्रसंगीं साहित्यास अंतर करीत नाहींत, म्हणून सांगितलें, त्याजवरून समाधान जाहलें.

---

१ तयार.

भले सद्गुंसी जे आहेत, त्यापासून प्रसंगास कोन्हे गोष्टीस अंतर पडेल ऐसा अर्थ नाहीं. राजश्री हरीपंत दिवाण (व) बावाजी बलाळ फडनणीस पा आहेत, भेटी नंतर वर्तमान निवेदन करतील. त्यामाणें प्रसंगीं साहितेस अंतर न करणें. आम्ही तुमचे पदरचेंच आहों. भेटी ही लवकरीच होईल. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे. हे विनंती

मोर्तब
सूद

श्री
राजा शाहू छत्र
पती चरणी दृढ भा
व देवजी सोमवं
सी हिंदुराव

Deoji Somavanshi writes to Bhaskarbhat Vaidya that he is satisfied to know from Haibatrao that you as a descendant of a noble family do not spare pains to look to his interect when necessary. Haripant Diwan and Bawaji Ballal Phadnis will inform what is wanted.

---

*No. 19* ] श्री नक्कल $\frac{1}{2}$

आश्वीन ब. ५।१६५४
२७।९।१७३२

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५९ परिधावी संवत्सरे आस्वीन बहुल पंचमी सौम्यवासर क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपती स्वामी यांणीं

शिका

देशमुख व देशपांड्ये तर्फ सैतवडे सुभा प्रांत राजापूर यांसी

आज्ञा केली यैसीजे, वेदमूर्ती राजश्री भास्करभट बिन रघुनाथ भट उपनाम वैद्य गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन वास्तव्य मौजे लावगन यांणीं सातारेयाचे मुकामीं स्वामी सनिध्य विनंति केली कीं, हरीराम व राघो विश्वनाथ व माहादो कृष्ण व माहादो बलाळ उपनाम जोग खोत मौजे नांदिवडे ता मजकूर यांजकडे

---

हा शिक्का अष्टकोनी आहे.

आपलें कर्ज होतें तें वारावयास त्यास मवसर[१] नाहीं यास्तव त्यांनीं आपले वतनी आगर व सेत ठिकाणें होतीं तीं आपणास कर्जामध्यें वतन करून दिल्हें

आगर ठिकाणें - - - - - - - - - बीगा

आगर वेळवाडी याची चतु:सीमा पूर्वेकडे धारसेडा वगैरे.

पूर्वेकडे धार सेडा, पश्चमेकडे सेतबंड्या, दक्षणेकडे चापडपऱ्हया, उत्तरेकडे अगर तो ना शंकर

सदरहू आगरास पाटवणी पाणी चालिलें आहे त्या प्राो येकून जमीन बिघे ८२

सेत ठिकाणें २

किता ठिकाण सेत खाचर याची चतु:सीमा.

पूर्वेकडे मिठागर, पश्चिमेकडे सेतवागसेद, दक्षणेकडे मंडप्या खाचर माहा, उत्तरेकडे दो कृष्ण सेत केळीचें

सदरहू शेतात नारळ माड सुमार ६ साहा आहेत जमीन बिघे ८१८२

किता ठिकाण सेत कुड्याट व रेवट

पूर्वेकडे मुवास आगर तानो शंकर, पश्चमेकडे सेत रेवट, दक्षणेकडे सेत बोड्या, उत्तरेकडे घोगल

बिघे ८॥।३

येणेंप्रमाणें आगर ठिकाण येक येकून जमीन दोन बिघे, देखील आगरावरील वर्कस जमीन व शेत ठिकाणें दोन येकूण दोन बिघे जमीन देऊन खरेदी पत्र करून दिल्हें आहे, त्याप्राो अनमवीत आहों. यैसी यास सदरहू ठिकाणें

१ ताकद. इनामपत्रें नेहमी तीन प्रकारची निघतात.
( १ ) आज्ञापत्र देशाधिकारी यास ( २ ) आज्ञापत्र देशमुख व देशपांडे यास ( ३ ) इनामदार यास पत्र.

महाराजांनीं आपणास इनाम करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे म्हणोन विदित केलें, त्याजवरून मनास आणून यांचें चालविणें स्वामीस अवश्यक जाणोन स्वामी यावरी कृपाळू होऊन सदरहू आगर देखील च्यार बिघे जमीन कुलबाब कुलकान्हू देखील हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार करून, नूतन इनाम दिल्हें असे. तरी तुम्ही सदरहू ठिकाणें व आगर यांचे दुमाला करून यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षीं नूतन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें असलपत्र भोगवटियास पर्तोन देणें. जाणिजे. लेखनालंकार.

रुजुसु — समत समत समत
रुनिवीस मंत्री सरकार.

A sanad by Shahu was granted to Bhaskarbhat Vaidya converting the mirasi lands of Nandiwade received by him in lieu of debt, from Jog, into inam lands.

---

*No. 20*] श्री

श्रा. व. ३०।१६५५
२८।८।१७३३ नंतरचें

पुरवनी पत्र. महराजाचें चौखंडी नांव, थोर थोर थोर उमराव हातीं आहेत, म्हणून सेवेसी विनंती केली येसीजे, समस्त उमराव मेळऊन त्यांसी सागनें कीं, जंजिऱ्यास वेढा घालणें, खोकरीमध्यें बैसनें, राजश्री संभाजी आगरे यांनीं आपलें आरमार सिध करून जंजिरा वेडणें, यैसें त्यांचें विमानमाक घेऊन, यैसी त्यास आज्ञा करणें कीं, तुम्ही जंजिरा घेऊन देणें. हे गोष्ट जाल्लिया उपरी आपन दों हजारानसीं आंजनवेली व गोवलकोटास निशान चडऊ, हा करीना लिहिला असे, सेवेसी श्रुत होये. हे गोष्ट केल्यानंतर आपलें वतन रायेगड, तेथील वौशा आवलादीचा कालें खुटल. साहेबाची कीर्ति म्रुत्येलोकीं होईल. या जंजिऱ्याचे पायीं त्यानें तलकोकनें काबीज करून तकतास पाई लाविलें, याकरितां पुढें असेंच होईल म्हणून विनंती केली. हे गोष्ट हेच समई केली तरी होईल, हे गोष्ट मिथ्या म्हणोन साहेबाच्या चित्तास नये तरी मी याचा जामीन. आपला येक कबिला व पुत्र हातीं देऊं. चालवनार स्वामीच आहेत. याखेरीज तुर्त लोक सेपन्नास आहेत यांची हजीरी घेऊन यांस रोजमारा पदरीं घालणें. कबिल्यानसी पदरीं पडतील. हें

स्वामिकार्या करितील, कांहीं स्वामीजवळ असतील. हा कागद मातुश्री तारासाहेब यांस विदित करणं. आम्ही आपल्या जिवावरी उदार असतां हे गोष्टीस महाराज अनमान करतील तरी कैलासवासी महाराज यांची आंने[1]. हें पत्र कोनांच हातीं जाऊं न देन. याखीरीज दुसरें वर्म असे, परंतु लिहितां नये. स्वामीची आज्ञा होईल तेव्हां मुखवचनीं सांगों. हें लिहिलें सेवेसी श्रुत होये. आम्ही राजश्री फत्तेसिंगबावा याजबराबर राजपुरीस गेलो होतो, तेव्हां उत्तम गोष्ट जाहाली होती. तीनसें कबिला हातीं लागला होता. जंजिरामध्यें गनीम नव्हता, त्येसमई आम्हांस आज्ञा केली असती कीं, तुम्ही जंजिरामध्यें जानें, तरी हे गोष्ट न करितां सिरलों असतों. त्ये गोष्ट न कारितां आल, म्हणून स्वामी × × कबील सोडून दिल्हे. त्येच कबील घेऊन गनीम जंजिऱ्यामध्यें जाऊन शाहार[2] जाहाला. आपन साताराास आले, तेव्हां आमच्या चित्तांत आलें कीं, सेवा स्वामीकार्याची नव्हे; म्हणून साहेबाचेकडेस राहिलों. तेव्हां स्वामिनीं माझा अंगिकार केलात नाहीं. हीनाऊन टाकिलें. येथून गेलीया तागायत घरीं राहिलों. स्वामी सर्वांस अनें देतात. तैसे आम्हांस देन. आनि आमची सेवा घेनं. आम्ही स्वामीचे सेवक असतां दुसऱ्यास सर्ण जावें येैसें नाहीं. सेवेसी श्रुत्ये होये. हे गोष्टीची आज्ञा काये ती लौकर करण.

आणखी येक वर्म आहे, तें केलियावरी गोवलकोट व अंजनवेली हस्तगत होईल आणि लक्षा पनासाची मत्ता साहेबांच्या हातीं लागेल, हे सेवेसी श्रुत होय. साहेबांच्या प्रतापें पनास लक्षांची मत्ता प्राप्त होईल. चौखंडी स्वामीची कीर्ती होईल. गाई ब्राह्मण प्रतिपाळ होईल.

The writer gives graphic details of the plans of conducting a war against the Siddis of Janjira and the capture of the two important forts of Anjanvel and Gowalkot, for which no sacrifice was too great, in the opinion of the writer.

---

१ शपथ. २ वरचढ. पत्राचा लेखक कोणीतरी महत्वाचा लढवय्या सरदार आहे. हें पुरवणी पत्र आहे. याच लेखकाचें दुसरें पत्र असलें पाहिजे.

*No. 21* ]

श्री

नकल

९ राखर
भाद्र. शु. १०।१६५५
७।९।१७३३

वेदशास्त्रसपन्न राजश्री भास्करभट
बिन रघुनाथ उपनाम वैद्य गोत्र गा-
र्ग्य सूत्र आश्वलायेन गोसावी यासि.

सेवक नारोशंकर सचीव नमस्कार. सुा सन आर्बा सलासीन मया आल्फ. तुम्ही हुजुर साताराचे मुकार्मी येऊन वर्तमान निवेदन केलें कीं, आपण स्नान-संध्यादिक शटकर्म आचरोन स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चिंतित आहों, या कारितां आपणास इनाम गाव देऊन कालक्षेप चाले ते गोष्ट केली पाहिजे म्हणोन विदित केलें, त्यावरून मनास आणितां तुम्ही थोर ब्राह्मण, सत्पात्र, स्वामीस व स्वामीच्या राज्यास आभिष्ट चिंतून आहा, यास्तव व तुमचें चालवणें आवश्यक जाणून तुम्हास मौजे जांबली ताा गुंजणमावल हा गाव स्वराज्य व मोगलाई येकून दुतर्फ कुलबाब कुलकानू, देखील हालीपटी पेस्तरपटी, खेरीज हकदार इनामदार करून इनाम दिल्हा आसे. येविशी बरकड सनदा सादर केले आसे, तरी तुम्ही मौजे माारचा सदरहूप्रमाणें यैवज, देखील इनाम तिजाई आपल्याकडे घेऊन आनभवीत जाणें. छ ९ रबिलाकर पाा हुजूर मोर्तब.

सुरु सुद बार

A Sanad to Bhaskarbhat Vaidya of Jambhali village by Naro Shankar Sachiv.

---

*No. 22* ]

श्री

नकल
१७ जिल्काद
चै. ब. १४।१६५७
३१।३।१७३५

राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यासि आज्ञा केली ऐसीजे. तुम्हाकडे दिवाणाच्या ऐवजाबद्दल राजश्री विसाजी रघुनाथ यास पाा, त्यास बहुत दिवस जाहले; परंतु ऐवज येत नाहीं. येथें तो खर्चाची निकड आहे, तर झाडियानिसी ऐवज मारनिल्हेच्या पदरीं घालून सत्वर

रवानगी करणें. ऐवज पो तूर्त ऐवज रुपये १०००० दहा हजार पा पावले.

×

छ १७ जिलकाद सुा खमस सलासीन मया ( तैन ) व अलफ, पाठविले ते पावले रुपये दाहा हजार १००००. सुधा आज्ञा.

A letter of Shahu to Raghuji pressing him to send money with Vishwanath bhat. Rs. 10000 have been received.

---

*No. 23* ]

श्री

भाद्र. शके १६५७
आगस्ट इ. स. १७३५

राजश्री भास्करभट वैद्य
गोसावी यांसी

०॥ द श्रीमंत अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्रे॥ येसाजी आटोळे दंडवत विनंति. उपरी येथील कुशल जानऊन स्वकीय लिहीण्यास आज्ञा केली पाहिजे. यावरी बहुत दिवस जाले, कांहीं वर्तमान कळों आलें नाहीं, याजकरितां चितार्चे समाधान होत नाहीं, तर येनारा बाा साकल्ये वर्तमान लेहून पाठविणें. तेनेंकरून समाधान होईल. आमचें वर्तमान तर वडिलाचे कृपेकरून सुखरूप असो. यावरी आपन राजश्री बाबासाहेबाबाा भेटीस येत होतो, त्यास यांहीं आपनास फौजेचे सरंजामी बदल येथ ठेविल आहे. याकरितां राहान जाल. म्हणून राजश्री कासीपंडित वडिलापासीं पाठविलें आहेत. ते व तीर्थरूप उदाजीबाबा उभयता विनंति करतील. ते मान्ये करून याच पारपत्य केल पाहिजे. सर्व प्रकार वडील आहे. आपन येथ बेफिकीर आहेत. वडिलांस लिहीन लागत नाहीं. सर्वज्ञ. मात्र लिा आहे. गोसावी यांनीं पहिल म्हैसीचेविसी लिा होत. त्यास इकड बरग[1] पडल्यामुळ म्हैसी फार रोड आहेत, चारा पाणी खाऊन ताज्या जालियावरी वडिलांस दसरिया कारन दुपत्या म्हैसी दोन पाठवून देऊं. आपलें समाधान असो दिजे. आपण सर्वस्व तुमचे सेवक असो. कलल पाहिजे. बहुत काये लिा लोभ असो दिजे. हे विनंति.

A letter by Yesaji Udaji Atole to Bhaskarbhat Vaidya showing his inability to accompany Raghuji to Satara.

---

× तैन हा शब्द नको तो चुकून पडला आहे. १ दुष्काळ

*No. 24* ]

श्री

भाद्रपद १६५७
आगष्ट १७३५

राजश्रियाविराजित राजमान्य
राजश्री भास्करभट बाबा स्वामी
गो यासि

सेवक भास्करराम सा। नमस्कार. विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकिये लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. श्रीमंत राजश्री बाबासाहेबांस राजश्री स्वामीच्या हात चिठ्या बलावणेयाच्या आल्या. त्यावरून दरमजल राजश्रीच्या दर्शनास फौजेनसी सीघ्रवत येतात. आपणांस कलावें म्हणोन लिहीलें असे. सविस्तर वर्तमान राजश्री बावानीं लिहीलें आहे, त्याजवरून निवेदन होईल. बहुत काये लिहिणें. हे विनंति.

A letter by Bhaskarram Kolatkar to Bhaskarbhat Vaidya intimating that Raghuji is soon procceding to Satara.

रघुजीस शाहूमहाराजानी बोलावल्याबद्दल म. रि. पेशवा बाजीराव पान ३७६ पहा.

---

*No. 25* ]

श्री

नकल
२९ जमादिलाखर
मार्ग. शु. ११६५७
४।११।१७३५




आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधरविश्वासनिधि राजश्री संभाजी आंगरे सरखेल ता। र्यानी[1] मौजे कचरे ता। सैतवडे सुा। सीत सलासीन मया व अलफ मौजे मारची खोती पुरातन रघुनाथभट वैद्य यांणीं आपली म्हणोन हुजूर विदीत केलें, त्यावरून किले जयेगडीं आज्ञा केली. त्यास खोतीचा पूर्वापार करीना मनास आणितां खोती वैद्यांची. वैद्य चालवीत असतां तौसल ता। गोहागर येथील भंडारी मौजे मारीं येऊन वैद्याजवळ जागा मागोन र्येतावा करून राहिला होता. मलबारीयाची धामधूम बंदरकिनारीं जाहाली, तेव्हां वैद्यांचा गुलाम मलेबारीस सामील होऊन यांच्या घरावर स्वारी घातली. त्याप्रसंगीं वैद्य परागंदा जाहले. मागें गांवीं तौसलकर भांडारी होता, तोच कांहीं दिवस खोती चालवीत असतां, सालगुदस्ता सोनजी व भांडारी या हरदूजणांत

---

१ रयत.

खोतीविशीं कजिया होऊन किले मजकुरीं मनसुफीस गेले व येसू तवसलकर भांडारी यानें वैद्यास सांगितलें कीं, " तुम्ही आपली खोती करणें." त्यावरूनही वैद्यही किले मारास येऊन आपले खोतीचा पूर्वापार करीना सांगितला, त्याजवरून भांडारी मजकुराच्या तकरीरा लिहूनं घेऊन व सत्य घालोन पुसिलें. त्यास सोनजी तवसलकर याणें सांगितलें कीं, पूर्वीपासून खोती वैद्यांची, हे परागंदा जाहालियावरी आपण चालवितों, आपला बहुत दिवस भोगवटा जाहाला आहे, म्हणोन सांगितलें व सिवघडे कमाविसदार व वतनदार यांणीं पुरातन खोती वैद्यांची, म्हणोन साक्षी दिल्ही. यापमाणें सिवघडे याच्या व तवसलकर भंडारी हाली खोती चालवितात. पाच जबान्या खरें जाहलें. भांडारी खोतीस लागू नाहींत म्हणोन किले मारची बखर व करीने हुजूर आले. त्यावरून मनास आणितां पुरातन खोत वैद्य, परन्तु कांहीं दिवस उपभोग न केला, याजनिमित्य याजपासून हरकी रुपये ५० पन्नास सरकारांत बसूल घेऊन वैद्यास खोती करार करून हें आज्ञापत्र सादर केलें आसे. भांडारी यास मौजे मारचे खोतीचा समंध नाहीं. भटगोसावी पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें खोतीचा उपभोग करतील. तुम्हीं यांचे रजतलबा वर्तोन गांवची किर्दी मामुरी करीत जाणें. जाणिजे. रा छ २९ जमादिलाकर मोर्तब आसे.

An order of Chhatrapati to Sambhaji Angre, communicating the decision in the dispute about the Khoti of Kachare, between the Bhandaries & the Vaidyas, handing over the Khoti to Vaidyas, the Bhandaries having usurped the Khoti during the trouble created by raiders from Malabar.

---

*No. 26* ] सन १७३६

### श्रीमहालक्ष्मीप्रसन्न

सेवेसी विज्ञापना. आपले आज्ञेप्रमाणें आज प्रस्थानें निघोन गेलों. त्वरेनें जाऊन काम चालीस लावितों. कालीं राजश्री पंतसाचिव व राजश्री प्रतिनिधि पंताकडे आले होते, त्यांनीं बहुत प्रकारें समाधान करून वस्त्रें दिल्हीं आणि मामलियात घालमेल जाली तेही प्रसंग करून पुनरपी करून देवऊ, म्हणोन भरोसा दिल्हा आहे. यैसि यास या गोष्टीचा प्रसंग दरबारीं केला तरी आपण बंदोबस्त करणें तो करतीलच. आम्हीही लौकर पोहचोन कस्त मेहनत करितों. राजश्री रावस्वामीकडून त्याग करून आपले पदरीं पडिलों आणि यांनीं

रा सचिवास भरोसा दिल्हा, यैसा विचार आहे. यास्तव येथील सर्व साहित्य बंदोबस्त करून अंगिकारीला मनसबा सिधीस न्यावा. सारांश आपल्यास दुसेरा अविलंब नाहीं. धरिला अभिमान परिणामास लावणार स्वामी समर्थ आहेत.

सूचनार्थ विनंति लिहीली असे. *हे विज्ञापना.

The robes of Sachivpada were given to Chimnaji Narayan by Shahu at the intervention of Shripatrao Parashuram Pratinidhi.

* या पुढील अक्षर लेखकाचें स्वतःचें आहे. नारो शंकराचा मृत्यु २३।६।१७३६ चिमणाजी नारायण यास वस्त्रें ८।७।३६

---

*No. 27* ]

श्री

९ रमजान
माघशु. १०। १६५७
१२।१।१७३६

श्रीमंत राजश्री भास्करबावा
स्वामीचे सेवेसी

विनंति. सेवक येसाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति. ता छ. ९ रमजान परियेंत स्वामीचे कृपेकरून मो पागा वर्तमान यथास्थित असे. विशेष. संगमेस्वर प्रांतें संकराजी बलाल याबा लोक देऊन स्वारी आपण रा केली होती, त्यास आंगेयाकडील स्वारी येऊन सकराजी बलाल यासी, दस्त करून धरून घेऊन गेले, हें वर्तमान छ मारीं आम्हापासीं येक दाहीजा[1] परिवारी लोक आले, त्यांनीं सांगितलें, वरकड लोकांचा भाग नाहीं. जे येथें आले त्यांचा दिलासा करून आम्ही येथें ठेऊन घेतलें. वरकड लोक जे वरिचेवरी येतील त्यांचा ही दिलासा करून लोक ठेवितो. तरी त्याची बे(ह)बुधी[2] केलीया दिलासाच आहे, नाहींतरी उठोन जातलि. याकरितां हें वर्तमान स्वामीस कलावें म्हणून लिहिलें असे. लोकांची बेगमी सत्वर करून पाठविली पाहिजे, म्हणजे जमावाची जमा राहेल. कललें पाहिजे. बहुत काये लिहिणें. कृपा केली पाहिजे. हे विनंति.

Yesaji Anant asks Bhaskarbhat Vaidya to inform Shahu Chhatrapati that Angre arrested Shankaraji Ballal & that Shankaraji Ballal's men require more men to oppose the enemy's forces.

१ दहा शिपायांची टोळी. २ तरतूद.

*No. 28* ]

श्री

कार्तिक व. १।१६५८
८।११।१७३६
इंदुवासर.

फेरिस्त सनदा राजश्री पंतसचीव यास करून दिल्हा त्या साहोत्र्याच्या.

राजपत्रीं राज्याभिषेक शके ६३ नलनाम सवत्छरे का बहुल प्रतीपदा इंदुवासर.

१ देशमुख व देशपांडे पा। येरंडोल सरकार असेर प्रा। खानेदश यास आज्ञा केली औसीजे. साहोत्रियाचें वेतन राजश्री नारो शंकर सचीव यास दिल्हें होतें, ते मृत्य पावले. हाली त्यांचे पुत्र रा. चिमणाजी नारायण सचीव यांचें चालवणें अवश्यक जाणौन याजवरी स्वामी कृपाळू होऊन पूर्ववत् प्रमाणें साहोत्रियाचें वतन यास अजरामऱ्हमत[1] करून दिल्हें असे, तरी तुम्ही पा। मजकूरीचा चौथाईचा आकार, देखील जकात व कमावीस बाब होईल त्या प्रो। दरसदे साहोत्राप्रो। पंडित मारनिल्हे यांजकडे वसूल मुरळीत देत जाणें. जाणिजे. लेखनालंकार लेखनसीमा. मोर्तबवर दोन सिके.

१ ता। मेहुणबारे प्रो। खानदेश येथें देशमुख व देशपांडे यास सदरहूप्रो।.

१ पा। हवेली नंदुरबार सा। मार प्रा। खानदेश येथें देशमुख व देशपांडे यास.

१ पा। जामनेर सा। असेर प्रा। खानदेश येथें देशमुख व देशपांडे.

४

बाजिरावबल्लाळ प्रधान यांचीं ताकीद पत्रें.

१ पा। चौगांवबारे प्रा। खानदेश यासी बाजीराव बलाल प्रधान सूर सन समान सलासैन मया अलफ. रा। चिमणाजीपंडित सचीव यांचें साहोत्रियाचें वतन आहे, यैसी यास पंडित मारनिल्हेनीं आपले तर्फेनें

---

१ बक्षिस, कृपादत्त.

चौथाई अमलाची वाटणीः– २५ बाबती (प्रतिनिधींनीं वसूल करून राजास देणें) ७५ मोकासां ( संस्थानिकास ). या पैकीं ६ साहोत्रा, ३ नाडगौड व ६६ ऐन मोकासा, येकूण १०० चौथाई.

पा मारास कमाविसदार पो असेत, तरी तुम्ही यासीं रुजु होऊन रा स्वामीचें आज्ञापत्र आहे त्या प्रो चौथाईचा आकार प्रो दरसदे सोह साहा प्रो साहोत्रियाचा वसूल सुरलित देणें. जाणिजे. छ २९ जमादिलावेल पो हुजुर. लेखनसीमा. मोर्तब. सिकाबरता.

१ पो वडगांव बारे प्रा खानदेश येथील देशमुख व देशपांडे यांस सदरहू प्रो.

२

A list of Sanads granted to Pant Sachiv for Sahotra Amal.

---

*No. 29* ] श्री नकल

छ. १४ रजब
का. शु. ९।१६५८
३१।१०।१७३६

तहबंद पा बीड व पा अबंड सुा सबासल्लासैन मयाआलफ राजश्री चिमणाजीपंडित सचीव यांणीं पा मजकूरच्या बाबती देखील, निमे जकातीचा सायरबाब व साबोत्रीयाचे अमंलदार राजश्री त्र्यंबकराऊ सोमवंसी सरलस्कर यांचे विद्यमानें करून मक्ता करार केला. येकसाला बेरीज रुपये

२७००१

एकूण सत्तावीस हजार येक रास करार केले असे.

यासी वाईदे ।बिा सावकारी निशा करून दिले रुा

९३०१ रसद ईा कार्तिक ता अखेर माहे मजकूर
८८५० माघी पुर्णिमा
८८५० जेष्ठ मास अखेर द्यावें

२७००१

येणेप्रमाणें सत्तावीस हजार रुा केले मुदतीप्रमाणें सालमजकूरची निशा सावकारी करून दिल्ही असे. पेस्तर सालापासून साले च्यार येकूण पांचा साला सदरहू सत्तावीस हजार रुा सालेसाले मक्ता करार केला असे. सावकारी निशा सालसाल सदरहू मुदती प्रमाणें करून देऊं. करारप्रमाणें सालसाल सावकारी निशा

करून ताज्या सनदा घेऊं. यास अंतर होणार नाहीं. करारास अंतर पडिलें तर मामल्यासी सिमंध नाहीं. छ १४ रजब.

A contrast made by Chimnaji Narayan Sachiv to pay the Babati and Jakati Sayar cesses of Beed and Ambad paraganas by instalments which amount to Rs. 27000/- This letter supports the date of death of Naro Shankar as 23-6-1736.

---

*No. 30* ]

श्री

जेष्ट व. १०।१६५९
११।६।१७३७
$\frac{3}{4}$

राजेश्रिया विराजित राजमान्ये राजश्री
महादजीपंत दादा स्वामीचे सेवेसी.

सेवक भुजंगराऊ रखमांगद सां नमस्कार. विनंति. उपरी येथील क्षेम ता जेष्ठ वद्यचे दशमी परियेंत मुकाम हंदूर जाणोन आपलें स्वकुशेल लिहित असलें पाहिजे. यानंतर यैसीयामध्यें आपल्या कडील वर्तमान कलो येत नाहीं, याजकरितां चित सापेक्षित असे, तर आपलें सविस्तर वर्तमान पाठविणें. तेणेकरोन समाधान होईल. यापूर्वी सटवाजी व निंबाजी जासूद याजबरोबरी हुंडी ५०७० पांच हजार सत्तर रुपयांची हुंडी पाठविली. त्यास दोन महिने होयास आले. पावले असतील. पावलियाचें उत्तर पाठविनें. ये प्रांतींचें वर्तमान तर रा। हरीपंतबावा श्रीमंत रा। आपा समागमें वड्याजगंनाथाकडे गेले असतां, तिकडील खबर यैकतों कीं, पौवन्याकडील मोगल सा हजार फौजेनिसीं आला होता, तो लुटून फौज माघारे फिरल्याचें वर्तमान आहे. श्रीमंत रा। रघोजीबावाचे वर्तमान तर नागपूर यांनीं ठानें घेऊन होतें, इतकियांत तेथील राजा पळून जाऊन दाहा गोंड मेळवून रात्रीं येऊन यांचे फौजेवर दंगा केला. इकडील तिकडील मानसेंही कामास आलीं. दुसरे निजामन मुलकाची फौज नागपुरीहून बारा कोसावर पोहचली. याजवरून बावा फौजेचे सहवर्तमान देवगडीस गेले. तेथेंही देवगडकरांचें यांचें मोठें झुंज जालें. तेथोन निघोन पौनी पातापगडावर फौज गेली. हें वर्तमान कलमी आपल्या मंडळींत कोठें पत्र आलें नाहीं; परंतु यैकिलें वर्तमान आपल्यास कळावयास लिहिलें असे. निजामन मुलकाचें वर्तमान कीं, नागपूर प्रांतीं छयावनी

होणार म्हनजे याचे बावाचे फौजेच छयावनीचा प्रसंग. बस्तरचे मुलकांत आवें यैसा तमाम तालुकयाच्या येथें बातम्या आल्या. याजवरून तालुकदारांनीं रुपये देणियास हात आखडला आहे. उभयेता फौजेचा येक निश्चये जाल्यासारखी गोष्ट सांगनार तोवर आपल्यासही चढ उताराची गोष्ट सांगता येत नाहीं. त्याही मध्यें फार बाकी वल्कोंडेकराकडे असतां तो मोकरबखां आवरंगाबादेहून वल्कोंडियास आला. आपल्या मुद्दसदीयास मार देतो कीं, गनिमानी माझा मुलक मारून लाख रुपयेयाची खराबी केली असतां गनीम लोकास रुपये कैसें दिल्हे ; मोठें अरिष्ट त्याच तालुकियाचें आहे. ईस्वर कैसा निर्वाह करील हें नकले. अवघ्या तालुकियाकडे जुज बाकी आहे; परंतु मोकरबखानाचे तालुकियावर फार रुपये राहिले आहेत. फौजेचा दबाव दाखवावा तर हें उभयताचें अरिष्ट याच प्रकारें आहे. मोठें संकट तेवढेंच आहे. दुसरे, म्हैसे परगना खट आहे तो सर्वत्रांस ठाऊक आहे. ते तेथील जो रुपया येतो तो तेथेंच सिबंदीस पुरत नाहीं. त्यामधें रा। हरीपंत बावांनीं आणुपराये सावकार याजला दीड हजार रुपये देणें, त्यां पैकीं आज ता। त्यास हजार रुपये पावले. साल तो अखेर आले. तेथील तैसा विचार. मुधोळ[1] जागीर हिरजुलाखान व थोरातास. आधींच ते मात्रागमनी. दुसरे त्याचे मुलकांत गनीम मोगल. याचे चार तळ पडोन तमाम मुलूख वैरान जाला. तेथें अद्यापि पुरता जमेस ठाव नाहीं. थोडाबहुत यैवज आला, तो कांहीं तेथील सिबंदीस खर्च होऊन थोडाबहुत यैवज आला तो वरचेवर हुंडीचे भरण्यांत पाठवितो. लोहगाव बेलोलीचा प्रसंग. तर तेथही हिरजुलाखानाची जागिर, वरकड कांहीं रा। छचोराऊ पिंगल्याची जागीर, वरकड लाहान लाहान दोन चार इसमे. तेथील ही विस्कळित कारबार आहे. थोडाबहुत तेथीलही वसूल येत जातो. तो वरचेवर हुंडियाचे भरणियांत पाठवितो. तोही तालुका पिटीचा. तेथेही सिबंदी फार लागते, यैसा विचार आहे. पेसजी रा। गोविंदरामाचें कर्ज बो × चे यैवजी पाच हजार तीनसे हुंडी पाठविली. तोही यैवज त्यास आद्यापि पावला नाहीं. आनखी ही हुंड्याचे भरन्यांत हुंडी व लापी कर्ज घेऊन रुपये पाठविले. तेही त्यास आद्यापि रा। पावले नाहींत. त्याचे ही तगादे लागले आहेत. आम्ही परम संकटांत आहो की, तुम्ही तेथें उत्तम आहात. कोन्हेही प्रकारें यंदाचा गला उगवल्या उत्तमांत आहे. ईस्वर निर्वाह करणार. यैसें ही तगादे असतां तुम्हास तेथ बोढ, म्हणोन येथील तगादे सोसून थोडा बहुत यैवज येता,

---

१ मुधोळ व इंदूर निजामहद्दीत आहेत

तो पाठवितो. येथें ही सावकाराची व्याज चढतात, येसा विचार आहे. पुढेंही तेथें कांहीं सच व्यावयाचे बोलाल तर तांब्राचें व बाबाचें रसायन कैसें उतरतें. दुसरे, हरीपंत बाबाच्या प्रसंग कैसा बनून येतो हें छ्यावनीस येके ठिकाणीं बेऊन तेथील विचार ध्यानास आणोन रा। हरीपंत बाबा लिहितील. तेव्हां मल-तेंही कर्म करणें उतरत आहे, तोपर्यंत कोठें बहुतांसे बोलीत न गुंतनें. येव्हडे चडीचा मामला दुसरा कोन करणार? जोपारियंत मोठा मनसुबा तिकडील हरीपंत बाबाचा न बनल्या, येथिल तालुकदार कोन खातरेस आणून रुपया देतात? सविस्तर आपणास श्रुत असावें म्हणोन लिहिलें असे. आपण पूर्वी लिहिलें होतें कीं, उमरखेडाकडील रुपया येत नाहीं. याजकारितां जरूर जाणोन मुजरद जासूद जोडी त्यांजकडे पाठविली. त्यानीं उत्तर लिहिलें कीं, पूर्वी अडीचा हजारा रुपयाची हुंडी पाठविली, या शिवाय रा। हरीपंत बाबांनीं हजार रुपये खर्चास घेतले, ते कर्ज काहाढून दिल्हे, तेच कर्जदारास रु॥ आद्यापि पावले नाहींत, यैसें त्यांनीं लिहिलें तें आपल्यास कलावयास लिहिलें असे. आनखी रा। गोविंद रामजीची चिटी हजार रुपयाची सोनजी गाडेकरावर सटवाजी व निंबाजी बरोबरी पाठविली. त्याचाही येथें तगादा लागला आहे. रुपये पावले असले तर तसेंच लिहून पाठवनें. न प्रावले असले तर चिटी रा। गोविंद रामाची परतोन पाठवनें. चिटी, पाठविली तर व्याजसुधा रु॥ देव लागतील. कापड व रुप्याचा जिनस सटवाजी व निंबाजी बरोबरी पाठविली, त्याचेंही पावलियाचें उत्तर पाठविणें. मामीलतीचें आकाराचें वर्तमान तर, रा. हरीपंत बाबांनीं व बापोजी नारायेण यांनीं आपलें रुबरू चुकोती[1] करून आपल्यास लिहिलेंच असेल, त्यावरून कळलें असेल. चुकोतीचे वेलेस आपण कांहीं जवळ नव्हतो. आपणास मोगलाचे लष्करास लिगमपेठेस पाठविले होते. तेथोन आल्यावर चुकोतीचें वर्तमान सांगोन आपणास रुपया वसूल करायास मात्र पाठविले. कळले पाहिजे. रा. हरीपंत बाबांनीं जातांनी हाती उमरखेडांत टाकून गेले होते. हतीस तांद-लाचें खानें पाहिजे. उमरखेडाकडे तांदूळ थोडा. मानसें गेलीं होतीं ते सांगो लागलीं कीं, हती रोड खराब जाला. यैसी वस्त गलित करावयाची नाहीं. याज-कारितांही जरूर जाणोन हातीस आणावयास मानसें पाठविलीं आहेत. निर्मल मातबर जागा आहे, तेथ आणविला आहे. त्यास तांदुळ चारून ताजा करविला

१ तडजोड, कर्जाचीफेड.

जाईल, हेंही आपल्यास वर्तमान कळलें पाहिजे. हलीं सिवाजी जासूद याज बरोबरी हुंडिया रुा १७०० सत्राशाच्या पाठविल्या असेत. यावाबियाचें उत्तर पाठविलें पाहिजे. माल्याची आपण फर्माविसी लिहिली होती, त्याचें उत्तर सटवाजी निंबाजी बरोबरी लिहिलें आहे, तें ध्यानांत आणोन उत्तर लिहिल्यासारखे जिनस पाठविली जाईल. बहुत काये लिहिणें. लोभ असो दीजे. हे विनंति.

श्रीमंत स्वामीचे सेवेसी राघो नारायेण सां नमस्कार. विनंति. उपरी वडिलीं कृपापत्र पाठविलें तें पाऊन परम आनंद जाला. मी सेवक स्थापित आपला आहे. सदैव याच प्रकारें पत्रीं सांभाळ करीत गेले पाहिजे. कितेक वर्तमान रा

×

भुजंगराऊनीं लिहिलें आहे, त्यावरून कळो येईल. हे विनंति.

Bhujangrao Rukhamangad writes to Mahadajipant Dada on the troubles he was encountering owing to the disturbed atmosphere brought about by the movements of the armies of Raghuji Bhosle and Nizam-ul-mulk in the region of Nagpur.

---

*No. 31* ] श्री

आषाढ शु. ११।६५९
१७।६।३७

राजश्री कमाविसदार मौजे लासुर्णे
व केशवराव मल्हार गोसावि यांसि.

सेवक महादाजी गदाधर अमात्य सुा समान सलासीन मया आलफ राजश्री भास्कर वैद्य यास कर्जाचे यैवजी मौजे मजकूर पैकीं गला रुो ४०० ब्यारशेचा देविला आसे. तरी सातारा बाजार निरख असेल त्यास दर रुपयास जाजती ८८१ येक सेर प्रो ब्यारसे रुो गला देऊन पावलियाचा कबज घेणें. जाणीजे. छ २९ सफर.

Mahadaji Gadadhar Amatya orders Keshavrao Malhar, and Kamavisdar of Lasurne to Give Bhaskarbhat Vaidya corn of the value of Rs. 400 in payment of his debt at a rate one sheer cheaper than the Satara rate

---

*No. 32* ] श्री नकल

९ रजब
कार्तिक सु. ११।१६५९
२३।१०।१७३७

कर्जरोखा शके १६५९ पिंगळनाम सवछरे कार्तिक सुध येकादसी तदिनी खत लिखीते धनकोनाम राजश्री भास्कर भट यासी ऋणकोनाम नरसिंगराव

